प्रकाशमाला-अमळनेर

पुष्प ६ वें

# कुटुंब-रंजन.

लेखक-आपटे गुरुजी, येवले.

१९४०

प्रथमावृत्ति

प्रकाशक— रामभाऊ भोगे. अमळनेर

आर्यांग्ल वैद्यक विद्यालय सातारा

मुख्य विक्रेते:—

महाराष्ट्र ग्रंथभांडार कोल्हापूर.

" " मुंबई नं. ४.





मुद्रक:—

विनायक शंकर वैद्य, आनंद प्रेस, सातारा.

# प्रकाशमाला, अमळनेर

राष्ट्राच्या नवीन संसाराला पोषक असे मंगल साहित्य मराठीत प्रकाशित करणे हें मालेचे उद्दिष्ट आहे

मुम्बई इलाखा, वऱ्हाड, मध्यप्रांत व बडोदें सरकारनी प्राथमिक व दुय्यम शाळा, ट्रेनिंग संस्था यामध्ये ग्रंथालयासाठी व बक्षिसासाठीं मंजूर केलेली ! ! डेक्कन व्हर्न्यॉक्युलर सोसायटी पुणें, या संस्थेने पारितोषके दिलेली ! ! ! मुम्बई, मध्यप्रांत व वऱ्हाड येथील हाय-स्कूलसमधून टेक्स्ट म्हणून सुरू असलेलो महाराष्ट्राचे आवडते लेखक साने गुरुजी एम ए. याची तोन पुस्तकें

**पुष्प १ लें ] श्याम खंड १ ला [ किंमत १ रु.**

पहिली दोन हजाराची आवृत्ति अत्यंत अल्पावधीत संपून देखील वाढत्या मागणीमुळे दुसरी आवृत्ति प्रसिद्ध केली आहे साने गुरु-जीचे हृदयस्पर्शी लिखाण व ओघवती लेखणी कोणास परिचित नाही आजच मागणी करा.

**पुष्प २ रें ] धडपडणारीं मुलें खंड १ ला [ किंमत १ रु.**

या त्रिखंडात्मक कादंबरीत देव, देश व कुटुम्ब यासंबधीची जी ध्येयें त्यांची चर्चा व भारतीय तरूणाच्या धडपडीचे हृदयंगम व स्फूर्ती-प्रद वर्णन आले आहे.

**पुष्प ३ रें ] जीवन कलह अर्थात श्याम [ किंमत १ रु.**
**खंड २ रा**

हे पुस्तक वऱ्हाड, मध्यप्रांत सरकारने इंग्रजी नवव्या इयत्तेला पुर-वणी पुस्तक म्हणून नेमलें आहे. आर्डर नं. १०८१, ता. १३।४।३९

—o—

## — आमचें प्रकाशन —

मुम्बई इलाखा, वऱ्हाड, मध्यप्रांत व बडोदे सरकारनी प्राथमिक व दुय्यम शाळा ट्रेनिंग संस्था यामध्ये ग्रंथालयासाठी व बक्षिसासाठी मंजूर केलेली! मालेची तीन लोकप्रिय पुस्तकें!!!

**पुष्प ४ थें ] जवाहरलाल [ किंमत १२ आणे**

लेखकः— आपटे गुरुजी

एका दिवसात एक हजार घरी गेलेले हे पुस्तक तुम्ही अजून घेतले नसल्यास आजच मागवा पंडीतजीच्या जीवनाचा ठसा हृदयावर उमटविणारे हे एक संग्रहणीय पुस्तक आहे.

**पुष्प ५ वें ] प्रकाश किरणें [ किंमत १२ आणे.**

लेखकः— भा. रा देवभानकर, बी. ए.

सर्व वर्तमानपत्रातून, मासिकातून मुक्तकंठाने वाखाणलेला! सुप्रसिद्ध साहित्यिकानी उत्तमोत्तम अभिप्राय दिलेला!! हा लघुकथा संग्रह आजच मागवा प्रत्येक तरुण-तरुणींनी आपली जीवननौका व्यवहार सागरात सोडण्यापूर्वी श्री. देवभानकर यानी सार्वजनिक जीवनावर पाडलेली ही प्रकाश—किरणे घेतल्यास त्याना आपल्या मार्गातील खाचखळगे दिसतील.

**— वालूची लीला —**

लेखकः— र. बा. केळकर. ए. एम्., चित्रकार.

शालापत्रकातूत लहान मुलाना सुपरिचित असलेला "वालू" आता घरोघर आपल्या लीला दाखवून करमणूक करील. ०मोठा टाईप पचवीस सुन्दर चित्रे व किंमत फक्त चार आणे. आपल्या बाळयाकरिता आजच मागवा.

# बालजीवन माला

**राष्ट्राचे भावी आधारस्तंभ म्हणजे बालगोपाल!**

त्यांच्या जीवनांत आनंद निर्माण करण्याकरितां मनोरंजक गोष्टी, भरपूर चित्रें असलेलीं मालेचीं पुष्पें अत्यंत स्वस्त किंमतींत म्हणजे फक्त चार आण्यांत देऊं

टपाल खर्च निराळा.

---

**प्रथम पुष्प "वाळूची लीला" प्रसिद्ध झालें!**

लेखक:-चित्रकार र. बा केळकर, A. M.

[ पृष्ठ संख्या ६०, चित्रें २५. ]

प्रकाशक:—रामभाऊ भोगे अमळनेर.

---

या पुस्तकास मुम्बई, वऱ्हाड, मध्यप्रांत विद्याखात्यांनीं शाळा व लायब्ऱ्यात उपयोगिण्यास मंजुरी दिलेली आहे

# पुस्तक सादर करतांना

प्रकाशमालेचें हें सहावें पुष्प वाचकांना सादर करतांना आम्हांस अत्यंत आनंद होत आहे. माझे मित्र श्री. आपटे गुरुजी यांचे प्रस्तुत पुस्तक प्रत्येक कुटुंबांत गेल्यास त्यांचे मनरंजन करील इतकेंच नव्हे तर या गोष्टी म्हणजे पारतंत्र्यातील समाजाच्या डोळ्यांत झणझणीत अंजन होय. समाजाचे मनरंजन करतांना डोळ्यांत अंजन घालून महान् तत्व दर्शविण्याची कला इसापनीतीप्रमाणें आपटे गुरुजींनी या कथासंग्रहांत अनुसरलेली आहे. मालेच्या इतर पुष्पाप्रमाणें याही पुष्पाचें यथोचित स्वागत वाचकांकडून होईल अशी अपेक्षा राखतो.

मुख पृष्ठावर पुस्तकाला साजेसें सूचक चित्र आमचे मित्र सुप्रसिद्ध चित्रकार गोळिवडेकर यांनीं काढून दिल्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहोत,

त्याचप्रमाणें पुस्तक छपाईचें काम अत्यंत आपलेपणानें व शक्य तितक्या लवकर करण्याचें कामी श्री. नरहरपंत लिमये व आनंद प्रेसचे कामगार बंधू यांनीं सहाय्य केल्याबद्दल त्यांचेही आभार मानणे आवश्यक आहे.

रामभाऊ भोगे,

प्रकाशक, प्रकाशमाला.

# छापत आहे ! ! !

प्रकाशमाला, अमळनेर



पुष्प ८ वें.

## पायांतील दगड.



—लेखक—

रामभाऊ भोगे, अमळनेर.

—स्वातंत्र्याच्या चळवळींत ज्या अनेक तरुणांनीं आत्मबलिदान केलें, त्यांच्या मनोभावांचें विश्लेषण प्रस्तुत कादंबरींत आढळेल

—ताजमहालाची स्तुती सर्वच करतात परतु तो उभारण्याकरितां ज्यांनीं पायांत पुरून घेतलें, त्या पायांतील दगडांचा कोणी विचार करीत नाहीं.

—परिस्थितीशीं झगडत राहून हिंदवी स्वातंत्र्याकरितां तळमळणाऱ्या प्रसिद्धीपराङ्मुख अशा तरुणांची ही सत्यकथा लवकरच प्रसिद्ध होईल.

—प्रकाशक—

प्रकाशमाला, अमळनेर.



## ‘ रंजन रहस्य ’

शिक्षणाच्या द्वारा ज्यांनीं जविनांत दूरवर प्रवेश केला आहे असें महाराष्ट्राचे दोन गुरुजी विद्यार्थी वर्गांत विशेष प्रसिद्ध झाले आहेत. एक अमळनेरचे साने गुरुजी व दुसरे येवल्याचे आपटे गुरुजी. या दोघाही गुरुजींनी शिक्षणाच्या सहाय्याने अनेक तरुणांच्या जीवनांत पुरुषार्थाची प्रेरणा निर्माण केली आहे. इतकेंच नव्हे तर साहित्याचे द्वाराहि तेंच कार्य त्यानीं अखिल महाराष्ट्रांत चालू केले आहे. साने गुरुजींचें साहित्य अद्यापि पुष्कळच अंधारांत पडून राहिले असले तरी जो कांहीं थोडा भाग प्रकाशीत झाला आहे त्याव-रून त्यांच्या साहित्याचे जिवंत स्वरूप लोकांच्या नजरेला येऊन चुकलें आहे. आपटे गुरुजींचे साहित्य आतां कोठें प्रकाशात येऊं पहात आहे. त्याच्या ‘जवाहरलाल’ने पहिल्या भेटींतच महाराष्ट्रांतील विद्यार्थ्यांचें आणि सामान्य जनतेचें चित्त वेधून टाकलें आहे. मला अशी आशा आहे कीं, आपटे गुरुजींचे सारे वाङ्मय यापुढें क्रमाक्रमानें वाचकांचे हातीं पडेल आणि साने गुरुजींच्या वाङ्मयाप्रमाणेंच आपटे गुरुजींच्या वाङ्मयानें महाराष्ट्रांतील सामान्य जनतेला जीव-नाचे उच्च संस्कार मिळत राहतील.

आपटे गुरुजींच्या लेखणींत विविध रंग भरलेले आहेत, हें ‘ कुटुंब-रंजना’वरून सहज दिसून येण्यासारखें आहे, चारित्र, काव्य, कथा कादंबरी, निबंध इत्यादि विविध रूपाचे साहित्य

त्यांनीं निर्मिलें आहे. हें सारे साहित्य केवळ मनःकल्पित नसून जीवनाच्या अनेकविध अनुभवावर आधारलेलें आणि उभारलेलें आहे. अशा प्रकारच्या साहित्यालाच जीवन-साहित्य असें नांव देतां येईल. जीवनांत वर्षानुवर्षें ध्येय दर्शनासाठीं साधक वृत्तीनें जी तपस्या चालते, ती जेव्हां साहित्याचे स्वरूप धारण करतें त्या वेळीं साहित्यांत जीवनाला मार्गदर्शन करण्याचे सामर्थ्य निर्माण होतें. साहित्य हीं जीवनाची हुंडी होय. साहित्यकाराच्या जीवनांत अत्यंत परिश्रमपूर्वक जे अनुभव-धन निर्माण होते ते समाजाला अनायासे उपलब्ध व्हावे म्हणून साहित्याची हुंडी काढली जाते. ही हुंडी जीवनाच्या सराफ-कट्यावर समाजाला वटवितां आली पाहिजे. आणि तिच्यांतील अनुभव-धनाचा आपल्या जीवनसिद्धीसाठीं विनियोग करितां आला पाहिजे. हीच साहित्याची खरी रंजकता होय. जीवन—रसानें रंगलेलें साहित्यच रंगवू आणि रंजवू शकेल.

कथा साहित्यात कल्पित घटना वर्णिलेल्या असल्या तरी त्या जीवनांतील सत्याचा आविष्कार करण्यासाठींच असतात. कल्पित म्हणजे असत्य नव्हे. असत्यानें आत्म्याची कोणतीच भूक शमत नाहीं, उलट त्याची फसवणूक झाल्यानें अशांती निर्माण होते. आणि ज्यानें अशांती निर्माण होईल त्यानें रंजन कसें होऊं शकेल? म्हणून कोणत्याही उच्च साहित्यात जेव्हां मन रमते त्यावेळीं जीवनाच्या साऱ्या क्षुधा

तृप्त झालेल्या आढळून येतात. बोध नीती आणि आनंद यांचे कधीं जीवनांत वैर आढळत नाहीं. त्याचप्रमाणें जीवनाचें संपूर्ण दर्शन करविणाऱ्या साहित्यांतही त्याचा विरोध कधीं आढळत नाहीं. बोध-हीन नीती ही केवळ जड यांत्रिक क्रिया होय. बोध आणि नीती या विरहीत आनंद निराळा आढळतच नाहीं. या तिघांचे सुंदर मिलन जेथे होते तेथेंच जीवनाला गाढ शांति प्राप्त होते.

'कुटूंब-रंजन'मधील कथा एकामागून एक वाचीत गेल्यास वाचकाला विविध प्रकारचा बोध होईल. जीवनाच्या नीतीचे दर्शन घडेल आणि सात्विक आनंदाची प्राप्ती होईल. यांतील भाषा सुबोध आहे. वर्णनें अर्थपूर्ण आहेत. उपरोध वक्रोक्ति विनोद इत्यादि साधनांनीं जीवनाचा-बोध वाचकांचे गळीं उतरविण्याचा प्रयत्न करण्यांत आला असल्यानें बोध वाङ्मयाचा रुक्षपणा यांत नाहीं.

सर्वत्र रसाळपणा भरून राहिला आहे. यांतून ज्या उदार भावना व्यक्त करण्यांत आल्या आहेत त्यांचा समाजांत जर सर्वत्र प्रसार होईल तर समाज-जीवन झपाट्यानें समृद्ध होईल. नवराष्ट्र निर्मीतीसाठीं ज्या सामाजीक सद्गुणांची सध्या विशेष आवश्यकता उत्पन्न झाली आहे त्या सद्गुणांची वाचकांचे मनांत आवड उत्पन्न होइल अशी दृष्टी या कथांत प्रामुख्यानें आढळून येइल स्वावलंबन, शिस्त, ध्येयनिष्ठा, अन्यायाचा प्रतिकार इत्यादी तत्वांचे महत्व खुबीदार पणानें

वर्णिले गेले आहे. ' मुक्ताफळांचा–लाभ ' ही कथा शुद्ध साहित्याचे दृष्टिनेंही वाचनीय झाली आहे. ' पतीची–सभा ' या मधील वैवाहीक जीवनावरील टीका कोणालाही समर्पकच वाटेल ' संशोधक–कोंबड्यांतील ' ' शिवरामपंती ' उपरोध छटी पण हृद्य झाला आहे ' मेधाव्रताचा शोध ' आजही आपणाला स्फूर्तीकारक होइल.

प्रकाशमालेचे हें पुष्प महाराष्ट्रांतील साऱ्या कुटुंबात प्रवेश करील आणि लहान थोरांना या साधिकालांत जीवनाचा योग्य मार्ग दाखवील अशी मला आशा आहे.

आश्रम, सासवड
३–४–४०

स. ज. भागवत.

# लेखकाचे निवेदन

माझ्या बागेमध्यें गुलाब, चंपक नसे तशी जाई ।
कोऱ्हांटीची कुसुमें जनते तू भाव पाहुनी घेई ॥

ह्या पुस्तकांत एकंदर दहा कथानकें संग्रहित केलीं आहेत. ह्यांत दोन कविता ज्या दिल्या आहेत त्या सह्याद्रि मासिकात पूर्वी प्रसिद्ध केल्या होत्या. "मेघाव्रताचा शोध" सुप्रसिद्ध लोकशिक्षणांत घेतला होता. पण आज त्याला नवा पोशाख घातला आहे. कविता व पहिली सात कथानके कुटुंबांतील मंडळीच्या रंजनार्थ लिहून तुरुंगातून धाडलीं होती, म्हणून 'कुटुंब रंजन' हें नांव या पुस्तकास दिलें आहे. सुट्टीच्या दिवशीं कुटुंबातील लहान थोर मंडळींनीं एकत्र बसून हें पुस्तक वाचलें तर लहान मुलांस यांतील गोष्टीचें रहस्य वडील मंडळीकडून समजून घेतां येईल.

प्रकाशमालेच्या उत्साही संपादकांनीं या गोष्टीं छापण्याकरितां मजजवळून मागून घेतल्या पण स्वतःच्या परीक्षेचा लकडा व सार्वजनीक कार्याचा व्याप यामुळें पुस्तकाची प्रुफें नीट तपासलीं जाण्याविषयींची त्याची नेहमींची दक्षता या पुस्तकांत दिसणार नाहीं. अस्थानी विराम चिन्हें पडलेली आहेत व इतरही अशुद्धें राहून गेली आहेत. हें लेखकाच्या पुस्तक छापून झाल्यावर लक्षांत आलें. पुस्तकावरचें चित्र हें तरुण प्रकाशकाच्या अभिरुचीला अनसरून आहे

दे. भ. रामभाऊ भोगे यांनीं ह्या कथानकांना प्रकाशित करण्याचें अंगावर घेतल्याबद्दल, आचार्य भागवतांनीं बहुमोल व उद्‌बोधक प्रस्तावना लिहून दिल्याबद्दल या उभयतांचा मी आभारी आहे. त्याचप्रमाणें वैद्य भालचंद्रशास्त्री झेंडे व श्री. वसंतराव यांनीं हस्तलिखित तयार करण्यास सहाय केल्याबद्दल या मित्रद्वयांचा मी ऋणी आहे,

अर्थहानी जेथें होत होती तेवढ्या पुरतेंच शुद्धिपत्र शेवटीं जोडलें आहे इतर अशुद्धें जीं राहून गेलीं आहेत त्याबद्दल क्षमा मागून वाचकांची रजा घेतो.

वाचक जनतेचा नम्र सेवक

**पांडुरंग आपटे.**



# अनुक्रमणिका.

# शुद्धीपत्र.

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १३ | १४ | तासांत | दिवसांत |
| ३३ | ५ | बैलांना | नोकराना |
| ७७ | १३ | कार्य | कर्मी |
| ७८ | २२ | बांधली | त्यानीं |
| ७९ | १ | सुंदर | उंची |
| ७९ | २२ | दायी | दासी |
| ८० | १५ | पूर्वयुगाची | पूर्वायुष्याची |
| ८१ | १५ | आतिन्याचा | आतिथ्याचा |
| ८४ | ३ | डोक्यांत | डोळ्यांत |
| ८४ | २१ | इतर | असते |
| ८५ | १७ | होत | इतकी |
| ८७ | १७ | निर्वार्थ | निर्वीर्य |
| ९१ | २२ | जर | तर |
| ९५ | २२ | सचे | रुचे |
| १०७ | ७ | आपले | तुमचे |

## संशोधक कोंबडा

**प्राचीन** काळीं कोंबडे हे आकाशांत घारीप्रमाणें यथेष्ट संचार करीत. भक्ष्याकरितां हिंडत असतां त्यांचे जे गति विभ्रम प्रगट होत ते भूसंचारी मानवांत कुतुहल प्रगट करीत. भक्ष्य नजरेच्या टप्प्यांत येतांच ते तिच्यावर जी चपलतेने व सफाईनें झडप घालीत ती घारीलाहि लाजविणारी असे. त्यांची वरटी उंच वृक्षावर असल्यामुळें व बुद्धींत सदैव जागृती असल्या कारणानें त्यांच्या अंडीपिलांना उपद्रव देण्यास इतर प्राणी धजत नसत. आजच्या ग्रामकुक्कुटीप्रमाणें प्राचीन कुक्कुट्टी बहुप्रसवा नसे. महिन्यातून एकवीस अंडीं न देतां ती प्राचीन कुक्कुट्टी एकादेंच प्रसवे. यामुळें कुक्कुट ज्ञाति सुदृढ व वीर्यसंपन्न असे.

अशा रीतीनें **निर्भय व स्वावलंबी** आयुष्य कुक्कुट ज्ञाति व्यतीत करीत असतां, त्या ज्ञातीतील एका मतिमान कुक्कुटाच्या नजरेस एक मोठा वृषभ आला. त्याच्या खांद्याला व्रण पडून त्यांत किडे वळवळत होते. ते पाहून तो कुक्कुट आकाशांतून त्वरेने उतरला व त्या बैलाच्या पाठीवर बसून त्याच्या व्रणांतील किडे खाऊं लागला. किड्यांची ही पीडा आपोआप दूर होत आहे हें पाहून तो बैल कांहींएक प्रतिकार न करतां त्या वनकुक्कुटाला घेऊन पुढें चालला. कांहीं वेळानें कुक्कुट्टाचें कृमी-भोजन आटोपल्यावर तो मान वर करून

पाहूं लागला तो त्याचे ध्यानांत आलें कीं चालत्या बैलाच्या पाठीवर बसलें असतां आपण एका स्थळापासून दुसऱ्या स्थळा-पर्यंत अनायासें जातों. आजचा त्याचा अनायासें झालेला प्रवास अंतराच्या दृष्टीनें अल्प असला तरी त्या शोधांत साठ-विलेलें तत्व मोठें होतें. तो वनकुक्कुट मतिमान असल्यामुळें आज त्याला प्राप्त झालेला हा मंत्र त्याने फुकट न घालविता तो पूर्णपणें सिद्ध करण्याचें त्यानें ठरविलें.

आजपासून इकडून तिकडे जावयाचें असलें कीं, तो ईश्वरदत्त अशा आपल्या पंखाच्या शक्तिवर अवलंबून न राहतां धावत्या जनावराचा उपयोग प्रवासाच्या कामीं करून घेऊं लागला. प्रथम प्रथम सहजगत्या जनावर आढळले तर त्याचा उपयोग तो करी, पण पुढें पुढें तो जनावराकरितां पुष्कळ वेळ खोळंबूनही राही. हें त्याचें वागणें त्याच्या ज्ञाति बंधूस खुळचटपणाचें वाटे व ते त्याला ' चक्रम ' म्हणत. पण आमचा कुक्कुटराज निश्चयी प्राणी होता. हेटाळणीने पाय मागें घेणारा लेचापेचा नव्हता. एक दिवस त्याचें संशोधक डोक्यांत एक कल्पना आली कीं, जनावराप्रमाणें, बैलाच्या गाडीचाही उपयोग आपण केल्यास आपला प्रवास आजच्या प्रमाणें मंद गतीनें व्हावयाचा नाहीं. कारण जनावरें सहज-गत्या त्वरेनें धावत जात नाहींत. हा नवा शोध त्याला लाग-ताच त्याला मिष्ठान्न लाभापेक्षांहि मोठा लाभ आपणास झाला असें वाटून त्यानें एक दीर्घ आरवली ठोकली. यापुढें तो

आपल्या नव्या शोधाचा भरपूर फायदा घेऊन लांबवरचे प्रवास अनायासें करीत असे. एका शोधातून दुसरा शोध लागतो त्याप्रमाणें गाडीच्या छपरावर बसून प्रवास करण्याच्या शोधातून त्याला आकस्मात दुसरा शोध लागला तो प्रसंग असा, ज्या गाडीवर तो बसून चालला होता ती गाडी एक दिवस गांवच्या आठवडे बाजारांत गेली. तेथें ठिकठिकाणाहून धान्य, भाजी–पाला, फळफळावळ व इतर खाद्य पदार्थ विक्रीस आलें होते. व त्यांतील कांहीं जमिनीवर सांडलें होतें. बाजार आटोपल्यावर जवळच्या झाडावरून तो कुक्कुटराज खालीं उतरला व त्या पदार्थावर यथेच्छ ताव मारूं लागला. एके ठिकाणीं पुष्कळसें भक्ष्य मिळविण्याची बाजार ही उत्तम जागा आहे हा शोध त्यानें आज आपल्या सुपीक मेंदूत टिपून ठेवला. माझें हें छोटे मस्तक काय अद्भुत चीज आहे ! माझ्या ज्ञाति बंधूना असली देणगी देवाने न दिल्याबद्दल मला त्यांची कींव येते. असें त्यानें उद्‌गार काढले. हा शोध त्याला लागला खरा, पण त्याचे लवकरच ध्यानांत आलें कीं, सगळ्या गाड्या कांहीं बाजारात जात नाहींत व प्रत्येक दिवशीं कांहीं "बाजार" भरत नाहीं. त्या बुद्धिवान कोंबड्याला वारांची माहिती अजून झाली नव्हती व दिवस मोजण्याची विद्या त्यास अवगत नव्हती यामुळें बाजाराच्या दिवशींच ठरीव रस्त्यानें गाडीवर बसून जाण्याचे त्याला जमेना. त्याला वाटे आपला शोध तर कांहीं खोटा नाहीं. पण त्याचा लाभ

हटकून घेण्याइतक्या त्यांतील सर्व खांचा खोंचा आपल्या लक्षांत आल्या नाहींत हें पाहून त्याचे मन खिन्न होई. पण फिरून यत्न करून पहाण्याची धम्मक, युक्ति त्यांस अवगत होती. त्यानें पुनश्च यत्न केला, आणि मग काय ! कोलंबस हिंदुस्थानचा रस्ता शोधण्यास निघाला आणि त्यास अमेरिकेचा शोध लागला त्याप्रमाणें आजच्या आपल्या कुक्कुटराजाच्या यत्नाचे झालें. आज तो एका श्रीमान् गृहस्थाच्या गाडीच्या छपरावर आरूढ होऊन चालला होता. ती गाडी कांहीं घटकांनीं मालकाच्या घराजवळ येऊन थांबली. मालक गाडीतून उतरून घरांत गेला व हे अनाहूत पाहुणे उडून झाडावर जाऊन बसले. स्वावलंबी जीवन टाकून परावलंबी जीवनाच्या संशोधनांत त्याचे मन गुंतल्यामुळें आज सकाळपासून त्यास खावयास मिळाले नव्हतें. तो इकडे तिकडे खावयास कांहीं मिळते कां म्हणून पाहूं लागला तों त्या घरमालकाच्या नोकरानें घरांतून खरकट्यानें भरलेलें भांडें आणून झाडाजवळच्या उकीरड्यावर पालथें केलें. तें पहातांच तो संशोधक कोंबडा खालीं आला व त्या बहारदार खरकट्याची अभिनव रुची घेऊं लागला. त्या खरकट्यांत भाजी होती, पोळीचे तुकडे होते, मिष्टान्नाचे अवशिष्ठ भाग होते. त्याची गोडी घेताना आज त्यास धन्यता वाटत होती. तो मनांत म्हणाला "माझी चिलींपिलीं व बायको येथें असतीं तर— पण काय, दुर्दैव त्यांचें !" आज त्यानें आपल्या मस्तकांत नोंद करून ठेवलीं कीं, मनुष्याचे घराजवळ

जो उकीरडा असतो तेथें उत्तम खाद्य अनायासें मिळूं शकतें." पण आजचा शोध हा नित्य स्वरूपाचा आहे का ती एक अकस्मात् घडलेली गोष्ट आहे हें पाहून आपली बुद्धि याबाबतींत निश्चित करण्याकरितां त्यानें त्या घराजवळच्या झाडावर तीन दिवस मुक्काम केला. तिन्ही दिवस त्याला उत्तम खरकट खाद्य मिळाले. तेव्हां त्यानें मनाशीं ठरविलें कीं, मानवाच्या घराजवळ आपण वस्ती करावी म्हणजे खाण्याची ददात नाहीं.

" इजा, बिजा, तिजा " जी गोष्ट होते ती खरी, निश्चित समजावी असे आपण मानव नेहमीं म्हणतो. हा नियम प्रथम आपल्या ह्या कुक्कुट राजानें बसविला व तो मनुष्य प्राण्यानें त्याचें जवळून उचलला. मनुष्य वन्य पशु-पक्ष्यापासून पुष्कळ गोष्टीं शिकत आला आहे त्यातीलच ही गोष्ट. तीन दिवस तोच तोच अनुभव घेतल्यावर तो कुक्कुट कोलंबसाच्या आतुरतेनें घरीं यावयास निघाला. घरीं येते वेळीं एकादी गाडी मिळते का म्हणून पाहूं लागला तों गाडी कांहीं आढळेना. शेवटीं निरुपाय म्हणून आपल्या पंखाचा उपयोग करून तो त्वरेनें घरीं आला. येताना सहज त्याचे मनांत एक विचार निसटता येऊन गेला कीं हें आपलें पंखच शेवटीं आपल्या कामाला आलें." पण ह्या विचाराला त्या विहंग राजानें आपल्या मनांत फार वेळ थारा दिला नाहीं. सुवि-चार-संयमाची कला त्याला अलीकडे चांगली अवगत झाली

होती. तो मनांत म्हणाला आतां आपण हा आपला नवा शोध आपल्या कुक्कुट मंडळीस सांगून त्यांजकडून ज्ञातिभूषण ही पदवी घ्यावी. घरीं गेल्यावर प्रथम ही सर्व हकीगत आपल्या धर्मपत्नीस आपण सांगू. ती माझा शोध ऐकून थक्कच होईल व मग आपण चांगला पति निवडला म्हणून ती स्वतःला धन्य म्हणवून घेईल व पिलांना बापाच्या उद्योगाचें अनुकरण करण्यांस सांगेल असा विचार करीत व आपल्या भावी अभिनंदनाचे मांडे मनात खात तो आपल्या घराच्याजवळ आला. मंडलाकार गति घेऊन तो झाडावर उतरला तो त्याच्या कोंबडीनें याचें स्वागत करून म्हटलें, "इतका वेळ कोठें रमला होता, दुसरी एकादी कोंबडी भेटली होती काय ?"

कोंबड्यानें हास्य करून म्हटलें "प्रिये, आपल्या ज्ञाति बांधवांच्या सुखाकरितां मी आज कितएिक वर्षे धडपडत आहे. शेवटीं आज तो शोध लागला. माझ्या ह्या अभिनव शोधाबद्दल तूं माझें अभिनंदन करशील व माझी सहधर्मचारिणी झाल्याबद्दल तुला धन्यता वाटेल असा मला भरंवसा आहे."

"सांगावा तर खरा आपला शोध" उत्सुकतेनें कोंबडीनें म्हटलें.

"आज मी एका मोठ्या गाडीच्या छपरावर बसून गेलों होतो."

"आहे मला तें माहीत" आपल्या संशोधक पतीच्या

उत्साहावर पाणी ओतीत कोंबडी म्हणाली “ देवानें दिलेले पंख टाकून गाडीवर बसून जाण्याचें वेड तुमच्या काय डोक्यांत शिरलें आहे कोण जाणें ? ”

“ म्हण, मला वेडा म्हण ” कोंबडा थोडा चिडून उद्गारला “मोठमोठ्या संशोधक लोकांच्या बायका आपल्या पतीला वेडाच म्हणत आल्या आहेत. तूं मला ज्याअर्थी वेडा म्हणत आली आहेस त्याअर्थी मी खरा संशोधक आहे यात संशय नाहीं. तुला जरी आज माझ्या शोधाची किंमत कळली नाहीं, तरी तुझी मुलें, नातवंडें माझ्या शोधाची वाहवा करून मला नेहमीं धन्यवाद देतील. माझी सार्वजनिक-रीत्या पुण्यतिथी साजरी होईल जा नाहींच सांगत मी तुला आपला शोध ” असें म्हणून तो महापुरुष—कुक्कुट खिन्न होऊन दूर जाऊन बसला. इतक्यांत त्याची कोंबडी त्याचे-जवळ आली व आपलें चोंचीनें त्याचें सुंदर मस्तकास स्पर्श करून म्हणाली “ प्रिया, मजवर असें रागावूं नये. मी कशीही असले तरी आपली आहे ना ? — बरं पहिल्याप्रथम हे चार दाणे मी आपल्याकरितां जपून ठेवले आहेत ते खावें. नंतर मी सर्व कांहीं आपलें बोलणें ऐकतें. ”

थोडा वेळ बळेंच ओढून धरून नंतर तो कोंबडा उठला व कोंबड्याच्या पद्धती प्रमाणें एक एक दाणा त्यानें खाण्यास सुरवांत केली. दाणे खात असतां त्याला आपला शोध तिला सांगितल्याशिवाय राहावेच ना. वाद होऊं नये म्हणून

एकाग्र मनानें त्याचें भाषण ऐकून ती म्हणाली "खरंच आपला शोध चांगला आहे !" असें बोलतांना ती कोंबडी–कोंबडे ज्या पद्धतीनें हंसतात त्या पद्धतीनें हसली. कोंबड्याला वाटलें बायको आपली थट्टा करीत आहे. पण विशेष तंटा भांडण न होतां तो रात्रीं झोंपी गेला. रात्री स्वप्नात त्याला तें गांव, तीं मानवांची घरें, त्या उष्टया पत्रावळी तें बहारदार खरकटें, हें सर्व वस्तुजात त्याचें दृष्टीं पुढून गेलें. जागा झाल्यावर त्याला आपल्या अभिनव शोधाचें कौतुक वाटून त्यानें आपल्या त्या खरखरीत नख्या आपल्या संशोधक मस्तकावरून फिरविल्या.

दुसऱ्या दिवशीं कोंबड–मंडळाची सभा झाली. त्यांत या कुक्कुट राजानें आपला शोध मोठ्या पांडित्य पूर्ण भाषेंत निवेदन केला. तो कथन करीत असतां आपल्या शोधानें कोंबडे समाजांत कौतुक निर्माण झालें आहे का हें तो बारकाईनें पहात होता. त्याचें भाषण समाप्त होताच कोंबडे–सभासदांत एकच खळबळ उडाली. कांहीं म्हणाले आपण मनुष्य वस्ती जवळ जाऊं नये. मनुष्य जात ही पशुपक्ष्यांची शत्रु आहे शिवाय आपण आपल्या पंखाचा उपयोग टाकून देऊन परान्नावर पुष्ट होऊं लागलो तर आपले पंख दुर्बल होतील. तरी पंखानें उडत जाऊन आपलें भक्ष्य आपण मिळविण्याची आपली चाल आपण सोडूं नये.

दुसऱ्या दृष्टीची मंडळी म्हणाली तें कांहीं नाहीं. या नवीन शोधाचा आपण भरपूर फायदा हा घेतलाच पाहिजे.

आयतें मिळत असतां विनाकारण परिश्रम कां करा. मनुष्य वस्तींत जाऊन रहाण्यानें आज पर्यंत चाखले नाहींत असे चवदार पदार्थ खाऊन आपलें जीवित उन्नत होणार आहे. मनुष्य प्राण्यापासून उपद्रव होईल असें एक वेळ गृहीत धरलें तरी त्यांची संगती आपल्याला उन्नतीकारकच होईल. परमेश्वरी योजनाच तशी दिसते आहे तेव्हां या अभिनव शोधाचा फायदा अवश्य घ्यावा.

सभेंत फारच जोराचा वाद होऊन दोन्हीही पक्ष समबल ठरून ठराव असा कोणताच होऊं शकला नाहीं. शेवटीं माझ्या शोधाचा फायदा घेण्याकरितां मनुष्य वस्तींत कोण कोण येण्यास तयार आहे म्हणून जेव्हां त्या कुक्कुट राजानें विचारलें तेव्हां कोणी कांहीं, कोणी कांहीं अशा सबबी सांगितल्या. शेवटीं तो कोंबडा आपलें बाधव आपल्या शोधाचें फक्त कौतुक करतात पण आपणाबरोबर येण्याचें कोणी धाडस करीत नाहीं असें पाहून आपलें कुटुंब घेऊन तो पुरोगामी कोंबडा मानव-वस्तींत राहाण्यास गेला. त्याची बायका पोरें त्याचे बरोबर गेलीं खरी पण कुरकुरतच.

गांवांत गेल्यावर तो पक्षीराज मानव-गृहाच्या आस-पास राही व उकीरड्यावर जें उष्टें पडे तें आनंदानें खाई. जेव्हां तें त्याला मिळत नसे तेव्हां त्याची संशोधक बुद्धी त्यास उपयोगी पडे. उकीरडा यथेच्छ उकरावा त्यांतून धान्याचे दाणे टिपावे. हळूहळू त्याची धर्म पत्नी त्याचे अनुकरण करूं

लागली. जमीनीवर आयतें मिळूं लागल्यामुळें त्याची उड-ण्याची शक्ति अनुपयोगामुळें क्षीण झाली. मात्र या पुढें कोंबडी बहु-प्रसवा ठरून कोंबड्याची खानेसुमारी वाढली. इतक्यांत मानवांनीं ह्या वाढत्या कोंबड—संख्येस आळा घालण्याकरितां त्याचें मांस खाण्याचा क्रम सुरूं केला. पुढें कोंबड्याच्या अंड्याची मानव जातीस चटक लागून त्यांनी कोंबडी—संवर्धन शास्त्रीय रीत्या सुरूं केले. त्याचें रक्षण कुत्र्या मांजरापासून करण्याची व्यवस्था झाल्यावर आत्मरक्ष-णाची ही त्यांची शक्ति क्षीण झाली. पण पक्ष्याच्या जातीचें ते आहेत हे दर्शविण्यापुरते आज त्यास पंख राहिले आहेत. ते सुंदर तेजदार व मोठे असले तरी उडण्यांत चिमणीही त्यास हरवील अशी त्यांची आज स्थिती आहे.

हल्लींच्या कोंबड्याच्या महान् पूर्वजानें जो शोध लावला त्यामुळें कोंबड्यांना गावांत आश्रय मिळतो. विशेष परिश्रमाशिवाय मानवाच्या घरीं खावयाला मिळतें, संशोधक बुद्धीला उकिरड्यावर भरपूर काम असतें, मानवाच्या संहार शक्तीला पुरून उरणाऱ्या जननशक्तीचा लाभ झाल्यामुळे कोंबड्यास सदैव धन्यता वाटत असते. "धन्य धन्य माझें जविन" असें जगतास आजचा कोंबडा आपल्या संशोधन भूमीवर उभा राहून दिवसांतून तीन वेळां उच्च स्वरांत सांगत असतो. कोंबडी मातेची मात्र दैना विचारूं नका. ती इतकी प्रजा निर्माण करते पण तिचा नित्य संहार डोळ्या-देखत चाललेला पाहून ती बिचारी केंकटत असते! पण मातेचें दुःख पित्याला काय होय!

## डबल सेंचरी

"मग काकांच्या म्हणण्याला मान देऊन दोन दिवस येथें नाहीं कां रहावयाचं" तिलोत्तमेनें शांतारामची विनवणी केली.

"हें पहा, तुमच्या सर्वांच्या आग्रहावरून विशेषतः तुमची स्वतःची इच्छा म्हणून मी दोन दिवसच कां दोन आठवडे देखील राहिलों असतो पण–"

"आला कां मध्यें 'पण'! आपण असा पण पुढें केला कीं आमचा पण मागें घ्यावा लागतो ना! मी मघाशीं वहिनी-जवळ प्रतिज्ञा केली कीं, कांहीं झालं तरी दोन दिवस मी इकडे राहून घेतेंच–"

"अहो पण मी काय म्हणतो ते पुरतं ऐकून घ्या अन् जर तुमच्या समजुतीनं माझं इथ रहाणं इष्ट वाटलं तर मी निश्चित रहातो. तुमच्या शब्दाबाहेर जाऊन मला कीर्ती जोडायची नाहीं. आपली परवानगी असेल तर जातों नाहींतर हिंदू जिमखान्याच्या सेक्रेटरीना कळवितो कीं, माझं खेळणं यावेळीं होत नाहीं कारण आमच्या राणीसाहेबांची परवानगी नाहीं."

तिलोत्तमा या भाषणानें प्रसन्न झाली व पतीच्या अड-चणी ऐकून घेण्याची तयारी एलिझाबेथ राणीच्या ऐटीनें तिनें दर्शविली. तेव्हां रणशूर रॅलेच्या विनयानें शांताराम म्हणाला

" तुम्हाला माहीत आहेच कीं, गेल्या चौरंगी सामन्यांत आम्ही पार्श्यांचा पराभव केल्यापासून ते फार चिडले आहेत. गेले चार महिने खूप तयारी करून आम्हाला त्यांनीं खेळण्यास आव्हान दिलें आहे. युद्धाला पाचारण केल्यावर त्याला नाहीं म्हणता येत नाहीं म्हणून मी मुंबईस जाणार आहे तेव्हां मी त्याना नाहीं कसा म्हणूं ? बाकी मला स्वत:ला कांहीं हे जातीजातीतले खेळ पसंत नाहींत म्हणा— "

" इतका जर महत्वाचा सामना असेल व आपली जर कीर्ती होण्याचा प्रसंग असेल तर मी आपल्याला अडवून कशी बरे धरीन. " असें रजपूत रमणी अंगात संचारून तिलोत्तमा म्हणाली. "मी काकाची समजूत करतें पण मला बरोबर न्यायला हवं. आपला जो गौरव लोक तेथें करतील तो पाहाण्याची माझी इच्छा आहे. मग मीही तयारी करते. " असें म्हणून तिलोत्तमा मान वेळीत घरात जाऊ लागली तिला अडवून शांताराम म्हणाला " तुम्ही या. माझी त्याला हरकत नाहीं. पण क्रिकेटमधलं यश शाश्वत नसत. एकादेवेळीं पहिल्याच बॉलला विकेट पडतें. आम्हीं या खेळांत रूळलेलें गडी तेव्हां अशा अकस्मित अपयशाचं आम्हाला काहीं वाटत नाहीं. पण तुमच्या नाजुक हृदयास उगीच धक्का बसावयाचा. उद्यां जर आमची सरशी दिसूं लागली तर मी तार करीन अन् मग तुम्हीं पहिल्या गाडीनें निघा."

तिलोत्तमेची आज्ञा घेऊन शांताराम मुंबईस पोंचला.

शांताराम म्हणजे क्रिकेटच्या खेळांतला चौकोनी चिरा. त्याचें ऐटदार बॅटिंग सुप्रसिद्धच होतें. तो पहिल्याप्रतीचा गोलंदाज जरी नव्हता तरी अडल्यावेळीं त्याची गोलंदाजी त्याच्या बाजूचें संरक्षण करी. क्षेत्ररक्षणाचे काम तो करूं लागला म्हणजे आकाशींची चपलाच जणूं नृत्य करते आहे असें प्रेक्षकांना वाटावें. शातारा‌म सकाळीं १० वाजतां हिंदुजिमखान्यांत येतांच उत्साहाचें वारे सर्वांचें अंगांत संचरलें. आपण आपलें यश राखणार असें जो तो म्हणूं लागला. शांताराम नक्की खेळणार ही बातमी पारशी जिमखान्यांत जाऊन पोचतांच तेथें एकच गडबड उडाली तेव्हा पार्शी कॅप्टन [ नायक ] म्हणाले " शांताराम येते आहे हेच च्यांगला आहे. बाकी इतर तात्यांशीं खेळून काय बी फायदा नाय त्यो खरा स्पोर्ट आहे. आपल्याला लई पसंत." पार्श्यांनीं टॉस जिंकला व ते खेळावयाला निघाले पहिल्या अर्ध्या तासात प्रार्श्यांनीं दीडशें धावा काढून एकही गडी बाद होऊं दिला नाहीं. शांतारामाची गोलंदाजी कदाचित् लागू पडेल म्हणून ते काम त्याच्याकडे सोंपविलें. शांतारामनें चेंडू हातीं घेऊन सहा फेकी करून एकही धाव पार्श्यांना घेऊं दिली नाहीं. दुसऱ्या वेळेस पार्शांचा एक गडी त्यानें मारला. बराच वेळ चिकाटीनें खेळणारी पार्श्यांची जोडी फुटतांच त्यांचें अवसान खचून त्यांचे तीन चांगले गडी एकामागून एक शांतारामच्या चेंडूनें बाद झाले. शांतारामाचें हें यश फार वेळ टिकले नाहीं, कारण पार्शी नेटानें आणि

सावधगिरीनें खेळूं लागून पुढें पुढें त्यांनीं शांतारामचें चेंडू चोपून काढावयास सुरवांत केली. २६७ धावा करून पार्श्यांचे सर्व गडी बाद झाले यावेळीं या खेळांत शांतारामच्या गोलंदाजीनें विरुद्ध बाजूचे चार गडी बाद केले होते. शिवाय दोन झेल पकडण्याचे श्रेय त्याच्या पदरांत पडलें होते त्यामुळें तंबूत येतांच त्याचें अभिनंदन सर्वांकडून झालें

नेहमीच्या पद्धतीप्रमाणें शांताराम तिसरा किंवा चवथा जावयाचा परंतु, " मला आज पहिला पाठवा " अशी त्यानें आपल्या नायकाजवळ मागणी केली या खेळांत उत्तम खेळाडूला पहिल्या प्रथम पाठविणें धोक्याचें असतें. एकादे वेळीं अकस्मात् रीतीनें चांगला गडी पहिल्याच चेंडूला जर बाद झाला तर पुढील खेळाडूंवर निराशेची छाया पसरते म्हणून शांतारामसारख्या पहिल्या प्रतीच्या खेळाडूस तिसरा किंवा चवथा पाठविण्याची पद्धत आहे पण आज शांतारामाची इच्छा प्रथम जाण्याची पाहून त्यांनीं त्याला आडकाठी केली नाहीं पण हिंदू खेळाडूंना शांतारामाचे पहिलें जाणें पसंत पडले नाहीं. पार्श्यांनीं हा काय डाव आहे बुवा म्हणून थोडीशी धास्तीच घेतली.

प्रथम अर्धा तास पर्यंत मंद गतीनें खेळास आरंभ करून शांतारामानें हळूं हळूं हात मोकळे केले आणि चाराचे फटके मारण्यास सुरवांत केली. सायंकाळीं खेळ संपण्यापूर्वी हिंदूंच्या धावांचा आंकडा शंभरवर गेला होता. त्यांत निम्मे

अधिक धांवा त्याच्याच होत्या. तंबूत येतांच त्यांचे स्वागत लोकांनीं मोठ्या आनंदानें केलें. पदरांत यश पडण्याचा संभव पाहून शांतारामनें त्रिलोत्तमेला येण्याविषयीं तार केली.

रविवारी खेळ सुरूं झाल्यावर हिंदूचे गडी एका मागून एक बाद होऊ लागलें पण शातारामच्या स्वतःच्या धावाचा आकडा सारखा चढत जाऊन शंभरावर गेला. पार्शी टीम शांतारामच्या बाबतींत अगदीं टेकीस आली होती हिंदू जिंकण्यास आतां पंचविसच धावा लागत होत्या व तंबूत एकच गडी शिल्लक होता शांतारामनें मोठ्या धीरानें व कौशल्यानें खेळून हिंदूच्या धावा २६८ वर नेऊन ठेवल्या इतक्यांत ते सहाचा टोला मारायला गेले तोंच त्याची बॅट चेंडूला निसरती लागून एका चलाख पार्शी खेळाडूनें त्यांचा झेल घेतला. शांताराम औट होऊन परत येतांच तो खेळ समाप्त म्हणून हिंदू नायकानें जाहीर केले. एक गडी शिल्लक ठेऊन एक धावाने हिंदूंचा जय झाला. कायदेशीर भाषेत हिंदूचा जरी जय दिसला तरी प्रेक्षकांनीं बराबरी झाली असाच निकाल दिला.

शांतारामनें या खेळांत १९० धावा करून हिंदुंची बाजू राखली म्हणून अनेक लोक शांतारामचे अभिनंदन करण्याकरितां हार घेऊन पुढें आले पण आज त्यानें कोणाचाच हार घालूं दिले नाहींत. त्यानें सांगितलें “ आजचा जय माझा एकट्याचा नसून आमच्या टोळीचा आहे, आमच्या

संघाचा आहे. तेव्हां तुम्ही संघ नायकाचेच अभिनंदन करावयाला पाहिजे. त्यांच्या अभिनंदनांत आमचें अभिनंदन आलेंच."

खेळ समाप्त झाल्यावर तिलोत्तमा व शांताराम ही समुद्रावर फिरावयास गेली तेथें ती शांतारामला म्हणाली "आपण किती तरी चांगलं खेळता! मला नव्हती कल्पना, अन्, लोकांनीं तरी आपल कौतुक किती बरं केलं! लोकानीं जेव्हां आपल्याला खांद्यावर उचलून आणलं तेव्हा मला फारच गंम्मत वाटली. पण मला किनई आपला आज फार राग आलाय" "कां बरं? पुऱ्या दोनशे धावा काढल्या नाहींत म्हणून? अग ते पार्शी गोलंदाज व क्षेत्ररक्षक कांहीं सामान्य कां होते?"

"मी तस कांहीं म्हणत नव्हते! लोक येवढें प्रेमानें आपल्या गळ्यांत हार घालीत असता आपण ते नाकारून लोकांचीं कां बरं निराशा केलीत"

"लोकांची उगाच निराशा करण्याची माझी इच्छा नाहीं नूं असे पहा कीं, क्रिकेट हा खेळ एकट्याचा नाहीं सर्व जणांचा मिळून आहे. तेव्हां यशाबद्दलच अभिनंदन संघाच झालं पाहिजे."

"पण आपल्या सारख्यांच्या जिवावरच तर संघाला यश मिळतं तेव्हां आपला सन्मान व्हावयाला नको का"

"हें व्यक्तिच कौतुक आम्हा हिंदी लोकांना फार

घातक झालेलं आहे. आमचे लोक संघाच्या यशा पेक्षां व्यक्तीच्या यशाकडे जास्त लक्ष पुरवनात म्हणून आमच्यात चांगले खेळाडू असूनही आम्हाला यावें तसें यश येत नाही "

दुसऱ्या दिवशीं पाठारे प्रभू मंडळानें शांतारामचा जाहीर सन्मान करण्याचें ठरवून अनेक लोकांना पानसुपारीस पाचारण केले होते. या समारंभात पाठारे समाजांतील एका पोक्त क्रिकेट प्रेमी गृहस्थाने शांतारामना द्यावयाचे मानपत्र वांचले. त्यात म्हटलें होते—" आज श्री. शांताराम यांच्या असामान्य यशाने पाठारे प्रभू जातीस धन्यता वाटत आहे. आजपर्यंत आमच्या ज्ञातीत अनेक क्रिकेटपटू झाले पण त्यांत शांतारामच्या यशाची बरोबरी करणारा गेल्या पन्नास वर्षांत कोणी आढळला नाहीं म्हणून आज ज्ञाती समाजातर्फे १००० रु ची थैली मी त्यांस अर्पण करीत आहे. "

आभार प्रदर्शक भाषण करतांना शांताराम गंभीर स्वरानें म्हणाले. आपण दिलेली थैली मी स्वीकारतो पण ज्ञाती तर्फे होणारा मान मला स्वीकारतां येत नाहीं. हा सन्मान आमच्या संघाचा व्हावयास पाहिजे. आपण मला आता दिलेला हार आमचे संघ नायकाचें गळ्यांत घालण्यास आपण मला परवानगी द्यावी. दुसरी गोष्ट क्रिकेटसारख्या खेळांत जाती-निष्ठेचे प्रदर्शन कशाला ? आजचा हा सन्मान प्रभू ज्ञातीतर्फे म्हणून न करतां त्यांच मंडळींनीं क्रिकेट प्रेमी म्हणून केला असतां तर राष्ट्रीय दृष्टीनें कितितरी बरें झालें असतें. इत-

क्यांत समारंभास आलेला पार्शी संघाचा नायक उठला व तेथील एक हार घेऊन "एक खेळाडू म्हणून मी तुमच्या संघाचा सन्मान करतो" असें बोलून त्यानें हिंदु–संघनायकाचे गळयांत तो हार घातला त्याबरोबर शांताराम उठून म्हणाला, आतां मला खरोखर धावाचें एक शतक [ सेंचरी ] काढल्याचा आनंद होत आहे. यापुढें चौरंगी सामनें ज्ञातींचें व्हावयाचें बंद व्हावे म्हणून खटपट करण्याकरतां मला आता मिळालेली हजार रुपयांची थैली मी खर्च करणार आहे.

इतक्यांत खादी पोशाखांत आलेले एक मुसलमान गृहस्थ म्हणाले "शांताराम तुमच्या तोंडचें हे वाक्य ऐकून मला डबल सेंचरी काढल्याइतका आनंद होत आहे." —

हिंद मातेच्या जयघोषांत समारंभ समाप्त झाला.



# शिस्तपूर

शिस्तपूर नगरचे लोक सुखासमाधानांत होते. उद्योग धंदा करून ते जे धन मिळवीत ते त्यांच्या अंगी लागे. उगाच एकमेकाच्या कुरापती काढून ते कालाचा व कष्टानें मिळविलेल्या धनाचा अपव्यय करीत नसत. नगर राज्याचे नियम आनंदानें पालन करीत असल्यामुळें त्यांचें व्यवहार सुरळीत चालत स्वच्छतेची काळजी जो तो घेई. यामुळें गांवांत रोगराई उत्पन्न होत नसे. निरोगी प्रकृति राहिल्यामुळें लोक नेहमीं उत्साहात राहात. पण असें रामराज्य नेहमीं थोडेच टिकणार ?

## सूख दुखूं लागलें.

कांहीं लोकांचें सूख दुखूं लागलें व गांवची शिस्त मोडावयास आरंभ झाला. तेव्हां लक्ष्मी त्यांना ह्मणाली, " असें कराल तर मी तुमच्या गांवात राहाणार नाहीं. "

" लक्ष्मी राहाणार नाहीं ह्मणजे काय ? आमच्या तिजोऱ्या ह्मणजे कांहीं देवदारी खोकी नव्हत. चांगल्या भल्याभक्कम पांचपांचशें रुपयें देऊन खरेदी केल्या आहेत " एक घटिंगण श्रीमंत आवशानें ह्मणाला.

" वेडे रे वेडे, मी हातावर केव्हां तुरी देऊन जाईन तें तुम्हाला कळणार देखील नाहीं. " लक्ष्मी हांसून ह्मणाली.

जेथें शिस्त नाहीं तेथें लक्ष्मी कशी राहाणार ? सूर्य अदृश्य झाला कीं, अंधार आपलें साम्राज्य पसरतो. त्याप्रमाणें

त्या शिस्तपूरांतून लक्ष्मी अदृश्य झाल्याबरोबर सैतानाचे राज्य सुरू झालें. सैतानाचें पाठोपाठ डोळे खेल गेलेला क्षय, घोंगडी पांघरून थरथर कांपणारा हिंवताप, नाकतोडी, कपाळ-दुखी, लठ्ठभारती वातगज यांनीं बाजारपेठ वसविण्याकरितां सैतानाजवळ परवानगी मागितली. तेव्हां तो म्हणाला.

" तुम्हाला परवानगी अवश्य मिळेल पण ती माझे कडून नाहीं "

" तुमच्यासारख्या बड्या सरदारांना जे खास परवानें द्यावयाचे ते आमच्या राणीसाहेबाकडून मिळतील. त्यांचे आगमन लवकरच होणार आहे तोपर्यंत तुम्हा मंडळींना थांबावे लागेल. "

सम्राज्ञी दुर्गंधी राणीसाहेबांचे आगमन

ठरलेल्या दिवशीं सम्राज्ञी दुर्गंधी राणीसाहेब मेण्यांत बसून आल्या त्यांचे स्वागत करावयाला सैतान जातीनें नगरसीमेवर हजर होता. मेण्यांतून राणी उतरली. तो तिचें बुरसलेलें दांत, पुवानें भरलेलें डोळे, पिंजारलेल्या केसांत उवांनी वसाहत केलेलें डोके, शेंबडे नाक, व फुटल्यामुळें दुर्गंधी येत असलेला कान अशा थाटांत आपल्या राणीला पाहून प्रत्यक्ष सैतानाला-सुद्धां क्षणभर किळस आली, व त्यानें तोंड वाकडे केलें त्या-बरोबर सम्राज्ञी दुर्गंधी राणीसाहेब फणकाऱ्यानें परत जाऊं लागल्या. तेव्हां तिची समजूत करण्याकरितां सैतान सौम्य-वाणीचा आश्रय करून म्हणाला,

" आजपासून माझें. या सैतानाचें साम्राज्य येथें सुरूं झाले आहे. सम्राज्ञीशिवाय सम्राटाला कोण विचारतो ? तुझ्या हांतून आज ह्या नगराचा नामकरण विधि व्हावयाचा आहे. आजपासून शिस्तपूर हें बेबंदनगर म्हणून लोकांत प्रसिद्ध होणार या नगराचा नामकरण विधि तुझ्या हांतून करावा असें मी ठरविलें आहे. नटीशिवाय सूत्रधाराचें काम जसें अडून बसतें त्याप्रमाणें सैतानाचें राज्य दुर्गंधीशिवाय चालत नसतें. तेव्हां राणीसाहेब, आपण परत जाऊन कसं भागेल ?

आपल्या प्रिय पतीच्या तोंडांतून स्तुतीचें मधुर बोल ऐकून दुर्गंधी राणी मनांत खूप झाली, पण बाहेर तसें न दाखवितां कुर्यानें ह्मणाली.

" मला पाहाताच तुम्हीं मघाशी तोंड वाकड केलं आणि वरती तुझ्याशिवाय माझें राज्य चालणार नाहीं म्हणतां ? माझ्याशिवाय तुमच्या दुसऱ्या कमी का राण्या पडल्या आहेत ? त्यांना घेऊन राज्य कराना ?

" होय, अवकळा, कुबुद्धी, वक्रता, वगैरे माझ्या अष्टनाइका आहेत खऱ्या— ' नारी मज बहु असती परि प्रीती तुजवरती ' म्हणून—

' नच सुंदरी करु कोपा । मजवरि धरि अनुकंपा ॥

तुझ्या मदतीशिवाय माझ एक पाऊल तरी पडेल काय ?

साम्राज्ञी दुर्गंधी राणीची समजूत या भाषणानें पटून तिनें मोठ्या थाटानें नगर प्रवेश केला. राजवाड्यांत गेल्यावर

तिने कुबुद्धीला मुख्य कारभारी करून सर्व नवीन व्यवस्था काय करावयाची ते समजावून सांगितले. श्रीमती कुबुद्धीबाईने सर्व गांव हिंडून फिरून पाहिला. स्त्रियांच्या भावनाशील कोवळ्या मनांत ठाणे दिल्याशिवाय आपल्या कार्याचा आरंभ नीट होणार नाहीं हें त्यांच्या ध्यानांत आले. लवकरच त्यांनीं गांवांतील महिला समाजावर आपले मोहिनी अस्त्र टाकले, तो काय चमत्कार झाला.

पूर्वी शिस्तपुरांतील स्त्रिया लक्ष्मी सारख्या नांदत होत्या. सिताबाईनें एक सुंदर ओवी म्हणून शेजारीणबाईला विनंति करावी, शीलवतीबाई, 'एका मनाने दोघी वागूं। माझी मैना तुझा राघूं खेळतील ॥' दुसरीनें आपल्या शेजारणीला म्हणावे, शेजारीणबाई, 'सडा घाला दाट दाट । माझ्या लाडक्याची वाट, आहे तेथे ॥'

ही मधुर भाषा सैतानी साम्राज्य पसरल्यावर शिस्तपुरांत नाहींशी झाली. क्षुल्लक गोष्टींवरून बायका आता बर्दळीवर येत. ठमाबाईनें आपल्या घरांतील कचरा विठाबाईच्या अंगणांत टाकावा, शेजारणीनें म्हणावें, 'माझा कचरा थोडाच आहे तो, मी काय म्हणून उचलीन ?

अशा रीतीनें घरापुढील निर्मळ व सुंदर अंगणाचे दृश्य नाहींसें होऊन कचऱ्याचे ढीग ठिकठिकाणीं साचूं लागून त्यावर गर्धभ मंडळाचा सुखसंचार होऊं लागला. घरांतील मुलांना आईनें, मावशीनें, काकीनें सकाळीं म्हणावे.

" नाऱ्या, गण्या, चिंगे, उठा समोरच्या घराजवळ शौचास जाऊन बसा. आपल्या घरांजवळ बसून घाण करूं नका." गणुकाकानें रात्री उठावें. व दत्तुआण्णाचे घरां–जवळ जाऊन खाऱ्या पाण्याचा पाट सोडून द्यावा. रामभाऊनीं दगड मांडून रस्त्यावरच सचैल स्नान करावे. गोविंदरावनीं डाहाऱ्याचा खर्च वाचविण्याकरिता घरांतील मोऱ्या भर-रस्त्यावर सोडून द्याव्या. अशी सर्व स्वागताची जय्यत तयारी झाल्यावर माशा व डांस यांच्या झुंडीच्या झुंडी येऊन त्यांनीं ठिकठिकाणीं जानवसा दिला.

कुत्र्यांनीं व गाईनीं रस्त्यावरील विष्ठा अर्धवट खाऊन उचलून नेण्यास अशक्य करून ठेवावी. अशा रीतीनें कुबुद्धीला यश आलेले ऐकून दुर्गंधी राणीची खासा स्वारी नगर पाहाणी करतां निघाली त्यावेळीं सबंध गांवांत जिकडे तिकडे उकिरड्याचें डोंगर झाले होते, व संशोधक शास्त्री कुक्कुटराज त्यावर आरूढ होऊन आपल्या संशोधन कार्याची द्वाही दिवसांतून तीनचार वेळा तरी देत होते. आपल्या बेबंद नगरांत गर्धभराजाना तुष्टी–पुष्टी आहे हें पाहून सम्रा-ज्ञीला समाधान वाटले नंतर कुबुद्धीनें राणीसाहेबाना पुढें नेले तो हॉटेलांतून व हलवयाच्या घरांतून कुजक्या तुपाचा व सडक्या अन्नाचा खुमासदार दुर्गंध जो बाहेर येत होता. त्याचा आस्वाद घेतल्यावर राणीसाहेब बेहद्द खूष होऊन घरीं परतल्या.

गांवामध्यें यापुढें भांडणाला ऊत आला. शिवीशिवाय शब्द ऐकू येईनासा झाला. ‘ माझा बाप गोविंदाने काढला ’ ‘ परशाने माझी आई उद्धारली ’ अशा कामाकरितां न्याय-मंदिरांत पक्षकारांची गर्दी होऊं लागली. मागणी तसा पुरवठा या न्यायानें भांडण–कुशल कज्जे दलाल लवकरच गांवांत येऊन बसले. प्रथम प्रथम हा माल जरी बाहेरून आणावा लागत होता. तरी लवकरच अस्सल स्वदशी–नव्हे ग्रामोद्योगी नव्हे गांवठी कज्जेदलाल तयार होऊन भांडखोर गांवकऱ्यांना स्थानिक अभिमान राखता येऊं लागला. हे लोक बाह्यतः नीट-नेटके, निर्मल आचाराचे जरी दिसत तरी त्यांची डोकीं व अंतःकरणें सडलेली होतीं.

गांवांत वकील, व्यापारी, दुकानदार, ‘सुखशांती गृहें’ यांची संख्या वाढूं लागली. त्यांच्या दुकानांच्या त्या रंगीत आकर्षक पाट्या, ती काचेची कपाटें, व्हार्निशनें चकचकणारी तीं टेबले, पॉलिश दिलेल्या त्या खुर्च्या, ते पेट्रोमॅक्स, ते पित-ळीचे दिवे यांनीं गांवाला शोभा आली. जिकडे तिकडे वरवरचा चकचकाट व लखलखाट पाहून लोक म्हणूं लागले “ ही लक्ष्मी नाहीं तर दुसरें काय ? ” अंतरिक्षांत गुप्तपणानें वास करणाऱ्या लक्ष्मीनें हें शब्द ऐकून नुसते हास्य केले. दुर्गंधी राणी सैतानाला म्हणाली, “ लोकांना वाटतें कीं, लखलखाटांत आणि चकचकाटांत लक्ष्मी नांदत आहे. माझ्या बेबंधनगरींत लक्ष्मीची पाऊल टाकण्याची प्राज्ञा नाहीं. या दिखाऊ चकच-

काटामागें दुर्गंधीचें राज्य नांदतें आहे कीं नाहीं ते नीट पाहा. कपबशा पाण्यांत बुचकळल्या म्हणजे मी नाहींशीं होते असें थोडेंच आहे? हॉटेलमागें कुचक्या अन्नाचा खुमासदार वास एकदा घेऊन या म्हणजे माझ्या अमंगळपणाची खात्री पटेल. रोगी माणसाच्या तोंडचा कप निरोग्याच्या तोंडी जाऊन घाणेरडे रोग मी आंत किती जलद पसरवीत आहे हें एकदां नीट बारकाईनें पाहा म्हणजे माझें सामर्थ्य तुमच्या ध्यानांत येईल. जे जे रुचकर पदार्थ आज लोक घरादारांत खात आहेत त्यांची त्यांच्या पोटांत मी किती जलद घाण करीत आहे हें सूक्ष्म दृष्टीनें पाहून घ्या. अन्नाचें रक्त झालेले व त्यामुळें लोकांचे तरी गाल गुलाबी झालेले तुम्हाला दिसतात का? घरात घाण, रस्त्यांत घाण, पोटांत घाण, असे दुर्गंधीचें साम्राज्य मी आज सर्वत्र पसरवीत आहे. यामुळें कुचक्या विचारांचे तरंग जिकडे तिकडे उठताना दिसतात. अशी वस्तुस्थिती असून तुम्ही म्हणतां लक्ष्मीचें राज्य !

श्रीमंतांच्या घरांत चागले पौष्टिक अन्न असून ते त्यांना आज पचत नाही. ज्यांना ते पचवितां येते त्यांना ते देऊन टाकण्याची लक्ष्मीपुत्रांना बुद्धी होत नाहीं. आज तुमच्या **शिस्तपुरीत** नव्हे, चुकले माझ्या पतीच्या या **वेबंधनगरीत** रोगानें ग्रस्त नाहीं असा एक तरी प्राणी आहे काय? सुख–समाधानाचे मधुरालाप चुकून तरी कानीं पडतात काय? याचे कारण माझे—दुर्गंधी राणीचें

येथें राज्य आहे. कुबुद्धीदासी आज महापदावर अधिष्ठित झाली आहे."

अशा तऱ्हेचे साम्राज्ञी दुर्गंधीचे तोऱ्याचे भाषण ऐकून लक्ष्मी चिडून म्हणाली—

"हे अवदसे! तुझे राज्य हल्ली चालू आहे. ही गोष्ट खरी, पण तें तसेंच अखंड चालेल अशी कल्पना करूं नकोस. गर्वाचे घर खालीं बरे का!"

कांहीं दिवसांनीं त्या बेबंधनगरींतील लोकांना आपल्या दुर्भाग्याचा वीट आला. व ते सर्वजण लक्ष्मीच्या मंदिरांत जाऊन तिला म्हणाले,

"हे देवी, आमच्यावर तूं प्रसन्न हो. आमचे अपराध तुझेवाचून कोण पोटांत घालील? लक्ष्मी म्हणाली,

"आला का कंटाळा तुम्हांला या बेशिस्त वर्तनाचा. मी तिजोरीत राहावे अशी तुमची जी खोटी समजूत होती ती आतां अनुभवानी नाहींशी झाली ना? मी तिजोरीत राहात नाहीं लोकांच्या तोंडावर जेथें आनंद व समाधान खुलत असते तेथे मी रहात असते. मी पुनश्च तुमच्यात नांदावयास यावे अशी जर तुमची मनापासून इच्छा असेल, तर—

प्रथम दुर्गंधीला बाहेर काढा.

"दुर्गंधीच्या मागोमाग सैतान निघून जाईल. सैतानांची जेथे वस्ती नाहीं. तेथें कुबुद्धी राहते कशाला? अगोदर तुमचं गांव निर्मळ करा. कीं, मग मी तेथें आपोआप येऊन राहीन."

लोकसभा लवकरच बोलावली गेली व तेथें दुर्गंधीला काढून लावावयाचा ठराव झाला. त्याला अनुमोदन देतानां श्रीयुत दूरदर्शी म्हणालें -

" हा ठराव खरोखर अंमलात यावा अशी जर आपली इच्छा असेल तर आपल्या गांवच्या प्राचीन नांवाप्रमाणें आपण शिस्तीनें वागले पाहिजें. एक प्रमुख नेमून त्याचे सर्वांनी ऐकावयाचं ठरविल तरच आपलं गाव बेबंदनगरी न राहतां शिस्तपूर ह्या पदवीस पुनश्च प्राप्त होईल.

मध्येंच प्रोफेसर तर्कट म्हणालें--

आचार स्वातंत्र्य व प्रचार स्वातंत्र्य ठेऊन मग वाटेल तें ठरवा.

त्यावर प्रो० समयज्ञ यांनीं त्यांना चोख उत्तर दिले कीं,

" क्रांतीच्या काळांत आचार स्वातंत्र्याचा चावटपणा चालावयाचा नाहीं. लोककल्याणाची अखंड तळमळ असलेल्या बुद्धिवान पुढाऱ्यांच्या विचारावरच सर्व गोष्टीं सोपविल्या पाहिजेत. व त्यांच्याच तंत्राने आपण चालले पाहिजे. " एकाचे अंगीं ठेवावे लाऊन " हा मंत्र आपणाला उपयोगी पडेल---

ह्या सभेतील भाषणे ऐकण्याला दुर्गंधी राणी तिची कुबुद्धी दासी व स्वतः सैतान-सम्राट ही स्वतः फितूर लोकांच्या घरांत गुप्तपणें येऊन बसली होती.

डोळे मिटून स्वस्थपणे पडलेल्या सैतानाला राणी

म्हणाली 'आपण स्वस्थ काय पडलात लोक जागे झाले! आपल्याला आता येथून पळून गेलच पाहिजे नाहीं कां?'

सैतान म्हणाला—

"तोच मी विचार करतो आहे. शिस्तपुरांत आपला निभाव लागत नसला तरी पृथ्वी अफाट आहे. जेथे तुझे स्वागत करण्याला लोक उत्सुक असतील तिकडेच आपण जाऊं चला!"

---

## आग्रह

रावबहादुर दिगंबरराव लठ्ठे यांच्या वडील मुलाचं लग्न मे महिन्यांत पुण्यास झाल्यावर सर्व मंडळी धुळ्यास आली. कोर्ट सुरूं होताच रावबहादुरांच्या स्नेही मंडळींनी लग्नाची मेजवानी देण्याबद्दल खूप आग्रह चालविला. तेव्हा रावबहादूर म्हणाले, "मेजवानी म्हणजे काय मोठी गोष्ट आहे. तुम्ही म्हणाल त्या दिवशीं आपण द्यायला तयार आहोत, करूं का येत्या रविवारचा बेत?"

असल्या प्रश्नाला नकारार्थी उत्तर कोण देणार? भोजनाचा बेत दुपारीं का रात्रीं घ्यावयाचा यावर भवती न भवती होऊन रात्रीं आठाचा बेत कायम झाला.

रावबहादूर सार्वजनिक गोष्टींत जरी सढळ हातानें

वर्गणी देत नसत तरी खासगी–घरगुती–समारंभांत पैशाची पिशवी सैल करतांना अगदीं मागें पुढें पहात नसत. वडील मुलाचें लग्न, सून मनाजोगी मिळालेली, व्याही दिलदार, अशा रीतीनें संसारांत दिगंबरपंताना सोन्याचा दिवस उगवला असें वाटत होतें. हल्लीं मन अशा रीतीनें प्रसन्न असल्यानें व स्वभाव थोडा हौशी यामुळें मेजवानीचा थाट जितका चांगला करतां येईल तितका त्यांनीं करावयचा असे ठरवले. गांवांतले उत्तमातेल उत्तम आचारी बोलावून आणलें.

त्यांना पन्नास पात्र आहे. असें म्हणून फर्स्ट क्लास बेत झाला पाहिजे असें बजाविलें.

" रावसाहेब सामान उत्तम द्या ! माल मसाला उत्तम दिल्यावर जर स्वयंपाक बिघडला तर कान धरा. परवा दामू शेटच्या इथें मोतीचुराचा बेत होता—"

" तुझी वटवट मला नको. चांगला स्वयंपाक कर म्हटलं तर लागला चर्पटपंजरी करायला. केशवराव ! या आचाऱ्याना ते मागतील तो शिधा काढून द्या. "

" बाई–साहेबांना विचारून देतो काढून. "

" रावसाहेब या कामांत बायकांचा सल्ला कांहीं उपयोगाचा नाहीं. त्यांच्या जवळ शेरभर खोबरं मागितलं कीं अच्छेरच देतील. अळूच्या भाजीला अच्छेरच दाणे मागितले कीं येवढें कशाला म्हणून विचारतील. आचारी जर बोलवावयाचा तर काटकसर कामाची नाहीं. "

" केशवराव, शिध्याच्या बाबतींत मजकडे तक्रार येता उपयोगी नाहीं. उद्या आपले ते दोन दिवाणखानें झाडून स्वच्छ ठेवायचे बरं का ? गच्चीवर बिछायत हांतरायची व जेवणाची व्यवस्था पुढच्या व मागच्या दिवाणखान्यांत करायची. "

शनवारी दुपारी चार वाजताच रावबहादूर कोर्टातून घरीं आले. भोजनाच्या व्यवस्थेत त्यांनीं जातीनें लक्ष घातले. घरातले एक जात पन्नास रंगीत पाट बाहेर काढलें. दहबारा घरची व श्रीमंत पक्षकारांकडची चांदीची ताटं आज भोजनास ठेवण्याचा त्यांचा बेत होता. ठरलेल्या वेळीं आठाच्या सुमारास त्यांची स्नेही मंडळी जमूं लागली. आठाचा बेत धरला होता परंतु जज्ज साहेबाना यायला थोडा उशीर लागल्यानें भोजनास आरंभ साडेआठ पर्यंत होऊं शकला नाहीं भोजनगृहांत आल्याबरोबर तेथला थाट पाहून रावबहादुराचे स्नेही उद्गारले, 'अगदी राइट रॉयल आहे बुवा. ' पुन्हां दुसऱ्या बाजीरावाच्या राजवाड्यातल्या पंक्तीस बसलो आहे असं वाटतं. नव्या वधूनी येऊन तूप वाढल्यावर भोजनास आरंभ झाला. एक एक पदार्थाची चव घेतांना जिव्हा लोलूपांच्या जिव्हेवर सरस्वती नृत्य करूं लागली होती. ज्याच्या त्याच्या मगदुराप्रमाणें व आवडीप्रमाणें पदार्थाचें सेवन झाल्यावर यजमान हातांत जिलबीचे ताट हातांत घेऊन आलें व म्हणालें, " आज माझ्याशीं गांठ आहे. मी वाढीन तेवढ्या जिलब्या खाल्ल्या पाहिजेत. रावबहादूर स्वतः मोठे खवय्ये होते. ताटभर जिलब्या म्हणजे

त्यांना गुमान वाटत नसे. आग्रहाचा सपाटा चालविला. त्यांच्या पाठीमागून ताकाचे द्रोण भरण्याकरितां मठ्ठयाचा गडवा घेऊन यजमानीणबाई तयार होत्या.

अशा रीतीनें यथेच्छ— नव्हे आकंठ भोजन झाल्या-वर मंडळी पुन्हां गच्चीवर आली यावेळीं त्यांच्या अंगांत जडत्व पूर्णपणें आले होतं. कोणी कोणी लोडाला टेकून हात पाय पसरून पोटावर हात फिरवीत " अरे बापरे किती जेवण झाल रे. " असे आपल्या मित्राला म्हणत होते, तो त्यांचा मित्र त्यांना म्हणतो, " खाण्यांत कुचराई करून पुन्हा ओर-डतो आहेस. माझ्या पोटाला इतके तडस लागले आहेत कीं, आतां ते सहन करणें शक्य नाहीं अशा तऱ्हेच्या भोजन यातनेच्या सुखातल्या दुःखाच्या त्यांच्या गोष्टी चालू असतां एक जण म्हणाला, " दहा वाजून गेले घरीं जायचय कीं नाहीं ! हे शब्द ऐकतांच मंडळी एकामागून एक कपडे करून जिना उतरूं लागली.

मंडळी जिना उतरून खालीं कांपांउंडमध्यें येतात तों त्यांना काय चमत्कार दिसला! एकजण आपल्या मोटारी जवळ गेला आणि शोफरला गाडी स्टार्ट कर म्हणून म्हणूं लागला तो मालकाप्रमाणेंच शॉफरच्या अंगातही जडत्व आले होतें. पेट्रोलच्या टाक्याजवळ खूप तेल सांडले होते. जवळ जवळ सर्वच मोटारींची ही स्थिती होती. ज्यांनीं भमन्या गाड्या आणल्या होत्या त्यांचे बैल फुगन ताठ झाले होते. हें

असें काय झालें म्हणून चौकशी सुरू झाली. गाडीवाले व शोफर मंडळी झोपेतून जागी झाल्यावर सांगू लागली कीं एक तरुण वीस बावीस वर्षांचा मुलगा रावसाहेबांच्या घरांतून आला होता त्यानें आम्हाला मघांशी लाडू जिलब्या खूप खायला घातल्या आणि म्हणतो " वरती वकिलांना आग्रह होतो आहे आपण त्यांच्या बैलांना कां करूं नये म्हणून त्यानीं सरकीची घमेलीं आम्ही नको नको म्हणत असतां बैलापुढें ठेवली. खूप खाल्यामुळें आम्हाला झोंप आली त्यामुळें बैलाकडे आमचे लक्ष गेलें नाहीं. इतक्यात त्याचा मालक रावसाहेबांना म्हणाला, " तुमचा आग्रह मला चांगलाच भवणार ! कुणी घातल आमच्या बैलांना खायला चौकशी तरी करा— ती तीनशें रुपयाची जोडी आहे.

अशा तऱ्हेचा संवाद चालू असतां रावबहादुरांचे धाकटे चि. बाबूराव ज्याना चक्रमराव असें लोक थट्टेनें म्हणत ते हळूंच येऊन मंडळींत उभे राहिले आणि साळसूदपणानें म्हणतात, "आबासाहेब काय झाल एवढं रागवायला ! बाबा वरती दिवाण-खान्यांत आग्रह करीत होते तो तुम्हाला चालला आणि तुमच्या बैलांना मी आग्रह केला तर चालत नाहीं! तीनशें रुपये महिन्याला तुम्ही मिळवितां अशा माणसाची प्रकृति आग्रहानें बिघडली तर कशी बर चालतें आणि एकदांच ज्या जोडीला तीनशें रुपये काय ते दिले त्या जोडींची प्रकृती बिघडली तर तुम्हाला राग येतो हे पहा मी आहे समतावादी मी सर्वांनाच सारखा आग्रह केलाय्— "

इतक्यांत रावबहादूर खेकसून म्हणतात. "आणखी काय काय केलस बाबा. तुला पागल–खान्यांत टाकलं पाहिजे."

जॉर्ज वॉशिंग्टनचा सत्यवादीपणा अंगांत संचारून मि. चक्रम म्हणाले, "बाबा माझ्याच्यानें खोटें बोलवत नाहीं. मी प्रथम या बैलांना यथेच्छ जिलब्या, लाडू चारले घोड्यापुढें चंदी भरून बादल्या ठेवल्या. बैलासबंधानें मी पक्षपात कसा करूं? त्यांना अत्यंत प्रिय अशी सरकी घमेली भरभरून त्यांच्यापुढें ठेवली. नंतर मी मोटारीकडे वळलो. मोटारीच्या टाक्यांत प्रथम भरपूर पेट्रोल भरलं. नंतर आठवण झाली, आज दादाच्या लग्नाची मेजवानी आहे. म्हणून त्या टाक्या सांडतील इतकें पुन्हां पेट्रोल घातलें. आग्रह केला नाहीं असं या जड मोटारीसुद्धां आतां म्हणणार नाहींत. मी सायकलकडे वळलो. त्यांना सरकी, चंदी, पेट्रोल थोडच आवडतं? वायू भक्षण करून त्या रहाणार, म्हणून सायकलचा आणला पंप, अन् त्यांच्या चाकांत चांगली हवा ठासली. टयूब टायर्सची पोट हवेनें फुगली. मग तुमच्या प्रमाणेंच त्यांना आग्रह करून ढेकर येईपर्यंत वारा चारला — "

"अरे! ए चक्रमराव आमच्या सायकली पंक्चर केल्यास कीं काय? म्हणे ढेंकर येई पर्यंत वायू चारला!"

हा सर्व प्रकार पाहून रावबहादूर खिन्न होऊन हात जोडून म्हणाले "आमच्या चिरंजिवांच्या पागलपणाबद्दल मी तुमची क्षमा मागतो."

चक्रमराव कृतांतकोपानें म्हणालें "बाबा आग्रहा बद्दल क्षमा, आश्चर्य आहे बुवा ! पाहुण्याबरोबर मी त्यांच्या वाहनांनाही आग्रह केला, याबद्दल तुम्ही मला धन्यवाद द्यायला पाहिजेत."

रावबहादूरांच्या रागाचा पारा आता खूप चढला होता. ते संतापून म्हणाले" ए गध्या, मोटार सायकल ही यंत्रें आहेत माणसं नव्हेत! एवढही तुला समजूं नये आणि पुन्हां तोंड वर करतोस !"

चक्रमराव ऋषींच्या शांत गंभीर वाणीनें म्हणालें "बाबा माणसाचें शरीर आणि त्याचें पोट हें सुद्धां यंत्र नाहीं का ?

पावसाळच्या आरंभीचा रोहीणी मंडप यावेळीं पडला होता आणि त्यांतच आकाशांत यावेळीं वीज चमकली. चक्रम रावच्या या वाक्यानें राव बहादूर आणि पाहूणे मंडळी यांच्या डोक्यांत एकदम नवकल्पनेची वीज चमकली.



# शर्यत कोणी जिंकली

बाबासाहेब बर्वे याच्याच वाड्यात केशव पेठे आज दोन वर्षें रहात होता. बर्व्यांच्या गंपूचा व त्याचा आज चार वर्षांचा स्नेह. दोघेही बी. ए. च्या शेवटच्या वर्षांत होते. केशवचें बर्व्यांकडे अलीकडे बरेंच येणें जाणें वाढलें होते. याचे कारण दोघेही बरोबर अभ्यास करीत हे एक असलें तरी गंपूची बहिण विमल, हिचें आकर्षण हे दुसरें बलवत्तर कारण असावे असें केशवचे मित्र म्हणत. विमल फर्ग्युसन कॉलेज मध्येंच पण पहिल्या वर्षांत होती. बाबासाहेबाचे मनात तिचें लग्न यंदाच आपलें देखत उरकून टाकावयाचे होतें. केशवचें स्थळ त्यानीं हेरून ठेवलें होतें. या शिवाय दत्तू परांजपे म्हणून त्यांच्या मित्राचा एक मुलगा होता त्यावरही त्याची नजर होती.

परांजपे व पेठे हे दोघेही गंपूकडे यावयाचे. पेठे हा गौरवर्णाचा रुपानें निटस व पोशाखाचा शौकिन असे. तो आला म्हणजे घरांतल्या माणसासारखा मोकळेपणानें वागावयाचा व गप्पाही खूप मारावयाचा, बुद्धिबळें व कॅरम हे खेळ केशवप्रमाणें विमलला आवडत असल्यामुळें, दोघे खेळावयास बसली म्हणजे वेळेची शुद्ध दोघांनाही न राहून आईची बोलणीं खाण्याचा प्रसंग लाडक्या मुलीवर अलीकडे येई. विमलकरितां इंग्रजी कवितेच्या नोटस् काढावयाचें काम केशवला

आपला अभ्यास सांभाळून करावे लागे. यामुळें जागरणाचा जो त्रास त्याला होई तो विमलनें नोट्स पाहून प्रसन्न वदन दाखविलें कीं, नाहींसा होई आपल्याला पेठे याची मदत अभ्यासांत होते हें पाहून विमलला त्याच्याबद्दल विशेष स्नेहभाव वाटूं लागला.

परांजपे हा सुद्धां प्रेमळ असे. पण त्यांचे प्रेम शब्दांपेक्षां कृतींतच दिसे. त्याचा करारी स्वभाव कोणाच्याही चटकन् लक्षांत येई. तोहि बाबासाहेबांच्याकडे यावयाचा पण अगदीं नेमल्या वेळेला. व बसला तर पंधरा मिनिटापेक्षां जास्त ठरत नसे. एकदा विमल परीक्षेच्या आगोदर दोन महिने आजारी पडली होती. तो विषमज्वर असल्यामुळें मदतीची आवश्यकता होती. म्हणून परांजपे यानें रात्रपाळी व केशवनें दिवसपाळी करावी असें ठरलें. दोघांनींही कष्ट फार केलें, पण एकानें विमलकरितां कॉलेज पंधरा दिवस बुडविलें. व परांजपे यानें कॉलेज साधून शिवाय सेवा–पुण्यही जोडलें. असें करण्यांत त्याला त्रास झाला खरा पण तो त्यानें आनंदाने सोसला.

लग्नाचे मुहुर्त जवळ आले. पेठे याचें स्थळ सर्व दृष्टीनें घरांत सर्वांना पसंत होतें. पण विमलनें आपलें मत स्पष्ट केलें नव्हतें. परांजपे व पेठे यांचेमध्यें तिचें मन हेलकावे खात होतें. बी. ए. ची परीक्षा दोन महिन्यावर आली. इतक्यांत सत्याग्रही युद्धाचा वणवा देशभर पेटला. राष्ट्राची हांक विद्यार्थ्यांपर्यंत पोहोंचली. तापामुळें विमलचा अभ्यास मागें राहीला होता.

पेठे, परांजपे यांचे अभ्यास ठीक होते तरी पण दोघांनींही सत्याग्रहांत उडी घ्यावयाचें ठरविलें.

एक दिवस केशव पेठे बाबासाहेबांकडे गंभीर चेहरा करून आला, व त्यानें आपला सत्याग्रहाचा बेत त्यांना कळ-वून त्यांची अनुमती विचारली. बाबासाहेबांनीं आपल्या नेमस्त स्वभावाप्रमाणें तरुणाला ज्या चार समजुतीच्या गोष्टी सांगावयाच्या त्या पेठे यांस आपुलकीच्या कळवळ्यानें सांगि-तल्या. पण त्यांस त्या पटत नाहींत असें पाहून त्या धूर्त म्हाताऱ्यानें म्हटलें, तुमचा बेत आमच्या विमलला पसंत आहे कां ते विचारा पाहूं ?

त्यानंतर केशव पेठे विमलकडे आला आणि म्हणाला.

" विमल सत्याग्रहांत मी भाग घेण्याकरितां जाणार आहे. "

" तुम्ही सुद्धां जाणार, मग माझा अपुरा अभ्यास पुरा कोण करून घेईल ? माझें गणित तर मेल कच्च आहे. "

विमलच्या करुण स्वरानें पेठे याचें मन कळवळलें व तो तिचे शांतवन करण्याकरितां म्हणाला " तूं कांहीं डोळ्यां-तून पाणी काढूं नकोस ? तुझी परीक्षा आटोपल्यावर मग मी जाईन. सत्याग्रह कांहीं आजच थांबत नाहीं. "

केशवच्या या आश्वासनानें उदासीन झालेला विमलचा चेहरा क्षणभर खुलला. तरी पण केशव कधीं निघून जाईल याचा नेम नाहीं अशा धास्तीनें तिनें पुन्हां अधिरतेनें विचारलें,

" मग तो बॉयनामियल थियरम् मला नीट समाजावून दिल्याशिवाय तुम्ही जात नाहीं ना? माझ्या डोक्यांत तो कांहीं केल्या शिरतच नाहीं. तुम्हाला कसं हो गणित चटचट येतं ! "

आणि तुला ग भावगीत कसं चटकन् रचता येतं ? "

" मला कसचं रचतां येतं ! गेल्या दोन माहिन्यांत मी एऽक देखील कवितां केली नाहीं. "

" बरं, विमल, मला लवकरच सत्याग्रह ऑफिसमध्यें जाऊन मी दोन महिन्यांनीं येईन असं सांगितलं पाहिजे. कारण मला त्यांनीं १० सत्याग्रहींचा कॅप्टन नेमलें आहे. व आमची टोळी आजच सत्याग्रह करणार होती. " असें म्हणून केशव तेथून निघाला. तो विमलनें ओरडून म्हटले.

" माझी परीक्षा झाल्याशिवाय नाहीं हो जायचं केशवराव ! नाहींतर मी तुमच्याशीं बोलणार नाहीं. "

केशव लगेच सत्याग्रह ऑफिसमध्यें गेला आणि " अपरिहार्य कारणामुळें मला सत्याग्रहास येतां येणार नाहीं तरी माफी असावी " अशी चिठ्ठी त्यांने सत्याग्रह मंडळाचें अध्यक्षास दिली. आणि तो घरीं गेला.

दुपारी बरव्यांच्या घरीं परांजपे आला. बाबासाहेबांच्या खोलींत जाऊन त्यांना नमस्कार करून म्हटलें ' बाबासाहेब, आशिर्वाद मागावयाला मी आलो आहे. '

" म्हणजे तुम्हीं निघालांत तरी कोठे ? सत्याग्रह बित्याग्रह तर नाहींना करीत ?

" होय मी सत्याग्रहांतच आज जाणार आहे. "

" आणि वडील माणसांना विचारायच कारण नाहीं वाटतं? "

" चांगल्या कार्यांत हो कसचं विचारायचं ? तुम्हीं रोज गीता–पाठ म्हणतानां? त्यांत नाहीं कां म्हटलं ' **सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभंते युद्धमीदृशम्**' महत्भाग्यानें असा प्रसंग आला आहे, तेव्हां विचारण्यांत कसला वेळ दवडावयाचा? तुम्ही आपला आशिर्वाद द्या. बाकी तुम्हीं कधीं चांगल्या कामाला आडकाठी घेतच नाहीं म्हणा–असें म्हणून प्रत्युत्तराची वाट न पाहातां तो चटकन विमलच्या अभ्यासाच्या खोलीकडे गेला. नानासाहेब अरे, अरे, म्हणत जागींच बसून राहिले. ते मनाशीं म्हणाले ' या पोराच पाणी कांहीं निराळेच आहे. केशव सारखा हा कांहीं समजुतीनें घेणारा मुलगा नाहीं. बाकी ज्याला सत्याग्रहांत खरा भाग घ्यायचा आहे तो कांहीं कोणाला विचारीत कां बसतो ? '

जवळच बाबासाहेबांचे एक जुने स्नेही बसले होते ते म्हणालें ' मला या प्रसंगावरून एक लोकमान्यांची गोष्ट आठवली. एक तरुण मुलगा लोकमान्याकडे देश कार्याकरितां मी ब्रह्मचर्यानें राहूं कां ? असें विचारायला आला होता तेव्हां लोकमान्यांनीं त्याला स्पष्ट सांगितलें अगोदर घरीं जाऊन

लग्न कर कसें. अशा बाबतीत ज्यानें त्यानें आपल्या हिमतीवर चालायच असतं ' बाकी बाबासाहेब, ही तरूण मुलं आपलं न कां ऐकेनात! पण परांजप्यासारखी पाणीदार मुल पाहिली कीं इंग्रजाला आतां हिंदुस्थानांत फार दिवस राहाता येणार नाहीं असं खास वाटतं. आज जितके तरूण देहावर उदार होऊन देश कार्याकरितां पुढें आलेले आपणाला दिसतात तेवढें जर लोकमान्यांना दिसते तर — ? अशा प्रकारचा त्यांचा संवाद चालला असतां परांजपे विमलला म्हणाला "

" Well विमल, आपलं ठरलं बर कां ? आतां भेट सहा महिन्यांनी, वर्षानीं फार तर दोन वर्षांनीं. तेवढ्या वेळांत एखादा चिमुरडा कडेवर घेऊन तूं मला तुरुंगाच्या गेटाजवळ भेटीला येशील "

विमल कांहीं म्हणणार पण तिला बोलायला अवसर न देतां परांजपे म्हणाला.

" विमल, केशव देखील मजबरोबर सत्याग्रहाला येणार आहे. "

" केशवराव कांहीं आत्ताच सत्याग्रहाला जात नाहींत. माझी परीक्षा होईपर्यंत राहीन, असें मी त्याच्याजवळून वचन घेतल आहे. आणि तुम्ही तरी माझे " उत्तर राम चरित्र " पुरं करून घेतल्याशिवाय जाणार कसे ? मी संस्कृतमध्यें नापास होईन कीं. ! "

दत्तोपंताच्या स्मृति पटलावरून " **स्नेहं दयांच सौख्यंच यदि वा जानकीमपि। आराधनाय लोकानां मुंचतो**

**नास्ति मे व्यथा ॥** " हा श्लोक झरकन गेला. आणि तो विमलला म्हणाला, " विमल परीक्षेचा स्वार्थ पाहण्याची का ही वेळ आहे ? आपण मोहांत जर सांपडू तर सरस्वती तरी आपणावर कशी प्रसन्न होणार ? " इतके दिवस सत्याग्रह चालू आहे आणि आम्ही अजून कां जात नाहीं, म्हणून तूं अद्याप विचारलं कसं नाहींस ? तू आर्य स्त्री नां ? स्त्री आणि त्याग हे समानार्थी शब्द आहेत असें सर्व कवी, नाटककार आपणाला सांगत नाहींत का ? राष्ट्राच्या हाकेला ओ देण्याची ही वेळ, आणि मी तुला उत्तरराम चरित्राचं शुष्क भाषांतर सांगत राहावं ! छे! छे! ' हा मी चाललो ' असें म्हणून विमलच मन कष्टी करणं जिवावर आलं होतं तो भाव न दाखविण्यां-करितां तोंड फिरवून परांजपे तीरासारखा " **स्नेहं दयांच सौख्यंच** " हा श्लोक आपल्याशी पुटपुटत निघून गेला. आणि विमलच्या कांनीं तें अस्पष्ट शब्द पडतांच ती एकदम स्वप्नांतून जागीं झाल्यासारखी झाली. तारुण्यांत तिनें नुक-ताच प्रवेश केला होता. निर्मळ व कोमल मधुर भावाचा ती आतां कोठे आस्वाद घेत होती. शीतल, मंद व सुगंधित अशा वायूच्या लहरी सेवन करतां करतां मध्येच एखादी उष्ण वायूची लहर येऊन लागावी त्याप्रमाणें विमलच्या मनाची स्थिति यावेळीं झाली. ती क्षणभर आपल्याशीच विचार करीत राहिली आणि नंतर एक दीर्घ श्वास सोडून म्हणाली "मला आता उत्तरराम चरित्राचा खरा अर्थ लागला."

कॉलेज मधल्या व्याख्यानांनीं का तेजस्वी ग्रंथाचा अर्थ लागतो? हा ग्रंथ खरा समजून घ्यायला तेजस्वी कृतीच नजरेसमोर यावी लागते. पुरुष खरोखरच कर्तव्य कठोर! **स्नेहं दयांच सौख्यंच यदि वा जानकीमपि। आराधनाय लोकानां मुंचतो नास्तिमे व्यथा ॥** असें त्रेतायुगात राम जसा म्हणू शकला तसा आधुनिक तरुण म्हणणार नाहीं, त्यांच्याच्यानें स्त्रियांच्या कोमल हृदयास धक्का लावणे होणार नाहीं असें मला वाटत होतं. असं कां बरं, मला वाटत होत? माझ्या भोंवतालची परिस्थितीच मला तसं वाटावयाला लावीत होती—माझी परिस्थिती—आमची परिस्थिती—कोणती बरं! गुलामांची परिस्थिति – गुलामगिरींत सुख मानणारे–कर्तव्य कठोर होणार नाहींत परंतु राक्षसी वृत्तीशी ज्यांना झगडा-वयाचे आहे रावणी राज्य ज्यांना नाहींसे करावयाचे आहे ते रामाप्रमाणें म्हणणारच कीं—"जगत् कल्याणा-करिता—लोक कल्याण्याकरिता–स्नेह दया इत्यादि कोमल भावना–फार काय पण प्रत्यक्ष प्रिय माणसाचाहि त्याग करा-यला आम्हांला कांहीं वाटणार नाहीं." दत्तोपंत तुम्ही आम-च्यांत बसतां उठता खरें, पण तुम्ही आमच्यातलें खास नव्हत. तुमचे पाणी कांहीं निराळेच. केशवराव प्रमाणें माझी विनवणी तुम्हांला मान्य झाली नाहीं. माझ्या पाशांत तुम्ही सांपडला नाहीं. तुमचं मजवर नाहीं कां प्रेम? नाहीं कसं म्हणावं? कर्तव्य कठोर रामाचं सीतेवर प्रेम नव्हतं कां!

अशा तऱ्हेच्या विचारतरंगांत विमल कितीवेळ तरी सांपडली होती.

विमलची पहिल्या वर्षाची परीक्षा होऊन गेली. बाबा–साहेबांनीं केशव पेठे याचें स्थळ जवळ जवळ नक्की केलं होतं. परंतु एकदां मुलीला विचाराव म्हणून त्यांनीं तिचा विचार घेतला. पण तिनें त्याला स्पष्ट जरी नकार दिला नाहीं, तरी आपली अनुकूलता आहे असेंहि दाखविलें नाहीं. त्यामुळें बाबा-साहेब थोडे बुचकळ्यांत पडलें. शेवटीं केशवरावलाच विम–लला स्पष्ट विचारावे लागलं. तेव्हां तिनें पुष्कळ आढेवेढें घेऊन शेवटीं म्हटलें " मी तुमचेवर लोभ करतें ही गोष्ट खरी, तुम्हीं निस्वार्थीपणानें केलेल्या मदतीबद्दल कृतज्ञही राहीन. तुमच्यांत कांहीं कमीं आहे असें मी कसं म्हणूं ? तुम्हीं सुंदर आहां, मजवर प्रेम करतां, हें सगळं खर; तरीपण दत्तोपंताच्या करारी स्वभावाचाच माझ्या मनावर जास्त परिणाम झालेला आहे. मी उत्तररामचरित्र वाचलं आहे. जानकीला लोककार्याकारितां टाकून देण्यांत मला कांहीं व्यथा होणार नाहीं असें कर्णकटू शब्द जरी रामचंद्र बोलला तरी सीतेच्या मनाची ओढ—

—केशवराव पुढचे शब्द ऐकायला थांबलाच नाहीं.

सहा महिन्याची शिक्षा पुरी होऊन दत्तोपंत परां-जप्यांच्या सुटकेचा दिवस आला, त्या वेळेला त्यांचे इष्टमित्र तुरुंगाच्या दाराशीं गेले होते. बराच वेळ वाट पाहिल्यावर एकाएकी तुरुंगाची दिंडी उघडली व आंतून वाळलेल्या चेहे–

त्याचा पण हंसतमुख असा एक तरूण बाहेर पडला, तोंच त्याला भेटायला आलेली मंडळी त्याचे भोंवतीं जमूं लागली. इतक्यांत एक अठरा वर्षांची कुमारिका हातांत एक मोठा थोरला कमालखानी हार घेऊन घाईनें पुढें सरसावली. आणि सर्वांच्या अगोदर तिनेंच त्याचे गळ्यांत हार घातला. तोंच तिचा भाऊ म्हणाला,

" ताई, हाच का मुहूर्त तुला सांपडला ? "

—— × ——

## जनता

जनता–नारी विचित्र भारी गुणि—जन प्रेमा कसें करी ।
ऐके मित्रा खरें सागतो, ध्यान ठेवुनी नाद—धरी ॥
सुन्दर खाशा पाषाणानी गुणी जनाला मारितसे ।
टिकला जरी तो त्या पाषाणी मदिर त्याचे बांधितसे ॥
निदा—टाकी लाऊन नतर पुष्पे स्तुतिची अर्पितसे ।
उपाशि ठेऊन नतर राशी मिष्टान्नाच्या ओतितसे ॥
जनता— रजन करावया जो जाई त्याला ती सोडी ।
जोडी त्याची मैत्रि जो तिज टाकुन जाईल दूर गडी ॥

## पतींची सभा

" दिवस बदलत चालले. काल कठीण आला, तेव्हां आपल्या परिस्थिती बद्दल विचार नको कां करायला? " असें गणपतरावांनीं निळूभाऊना विचारलें.

निळूभाऊ म्हणाले " गणेश, परिस्थितीचा विचार करणारी मंडळी निराळी आहेत आपण पडलो नोकर भाई, येवढ्या मोठ्या देशाचा विचार तो आपण काय करणार ? "

" मी देशाच्या परिस्थिती बद्दल म्हणत नाहीं तुमच्या आमच्या परिस्थितीबद्दल म्हणत आहे. असें पहा निळूभाऊ, आमची आई वडिलांसमोर उभी सुद्धां रहात नसे, दोघांना बोलतांना मी पाहिलें नाहीं. पण अलिकडच्या बायका कांहीं निराळ्याच. नवऱ्याचा पाण उतारा करतांना त्यांना कांहींच वाटत नाहीं. कमी जास्त बोलण्याची हल्लीं सोय तरी आहे कां ? लगेच घर सोडून जाऊं लागतील. अशावेळीं काय करावं बरं ? मला वाटतं घरोघरीं हीच अवस्था आहे. म्हणून पतींचं हें सार्वत्रिक दु:ख समजून पती मंडळाची एक सभा भरवावी. डायरेक्ट ॲक्शन घेण्याचें आगोदर सर्व पतींनी आपलीं दु:खें निवेदन करून त्यावर यथामती उपाय सुचवावें. नंतर ते अमलांत कसें आणायचे ते पाहूं. प्रत्येक जात व संघ आपल्या हितसंबंधाचें संरक्षण करण्यासपुढें सर-सावत असतां आपण तेवढें मागें रहाणें पतीज्ञातीच्या दृष्टीनें

बरं नव्हे; म्हणून निळूभाऊ तूं व मी ही पतींची सभा बोलावूं. तूं हो स्वागताध्यक्ष मी होतो चिटणीस."

"बहोत अच्छा. तुझी योजना मला सोळा आणे पसंत आहे. या घटकेपासून माझ्या अंगांत अध्यक्ष संचारला आहे. म्हणून अखिल भारतीय पती मंडळाचा अध्यक्ष आपल्या चिटणीसाला फर्मावतो आहे कीं, "पती मंडळाच्या सभेची व्यवस्था नीट चांगली ठेव."

गणपतरावांनीं स्वगताध्यक्षाच्या संमतीनें पहिले बुलेटीन काढलें तें असें:--

"सगळीकडे सभा संमेलनें भरत आहेत. प्रत्येकजण आपल्या समाजाची काळजी घेत आहे. आपले संघटन करून जर आपली स्थिती सुधारली नाहीं तर पती मंडळावर अनर्थ कोसळल्या शिवाय राहणार नाहीं, म्हणून नाडलेल्या पतींच्या विनंतीवरून पतींची सभा ११३ गिरगांव या बंगल्यांत भर-ण्याचें ठरलें आहें. तरी सर्व पतींनीं जात गोत मनांत न आणतां रविवार ता. १ सप्टेंबर रोजीं वरील ठिकाणीं चार वाजतां अवश्य यावें."

या बुलेटीन्सच्या पांच हजार प्रती काढल्या होत्या व त्या बंगल्यातून, चाळीतून, नाटकगृहांतून, सिनेमागृहांतून फार काय सांगावे समुद्रावर फिरायला येणाऱ्या लोकांतून जो मनुष्य, नवरा असा दिसेल, भासेल अगर माहिती असेल त्याला देण्यांत आल्या.

हें बुलेटीन वाचून प्रत्येक पतीनें ते खिशांत, डेस्कांत ट्रंकमध्यें, ड्रॉवरमध्यें अगर पुस्तकांच्या कव्हरमध्यें लपवून ठेवलें होते. प्रत्येकानें आपलीं दुःखें कोणची याचा विचार केला. कांहींनी टिपणें तयार केली. कोणी मोठाले लेख लिहून काढले

ठरलेल्या वेळेच्या अगोदरच ११३ नंबरच्या प्रशस्त घरांत पतीलोक जमूं लागेल. बरोबर चार वाजतां सभेचा दिवाणखाना गच्च भरला असतां चिटणिसांनीं उठून सांगितलें कीं, ' अध्यक्षस्थान निळूभाऊ महारुद्र यांनीं स्विकारावे. ' या सूचनेस अनुमोदन मिळून अध्यक्ष स्थानापन्न होऊन म्हणालें ' तुमच्या सभेचे कायमअध्यक्ष ठराव मांडण्याची वेळ आली म्हणजे निवडा.' माझें काम, प्राथमिक चर्चा चालविण्या पुरतेंच आहे. प्रथम आजच्या सभेपुढें आपलीं सुखदुःखें मोकळेपणानें मांडूं या.

यानंतर एक पती पुढें आला त्याचं वय तेरा—चवदा वर्षांचें होतें, कारण आज लहानापासून भाषणास आरंभ करावा अशी सूचना वक्त्यांस मिळाली होती. बाल पतिराज गंभीरपणानें म्हणाले.

" माझें नांव बळवंत पण मला घरांत बाळ्या म्हणतात. एकेरी नांवानें हाक मारून माझ्या पत्नीच्या देखत माझा हा अपमान नित्य होत असतो. अशा स्थितींत माझा बोज तिज

जवळ कसा रहावा? माझी दुसरी तक्रार अशी आहे कीं, घरांतील दुसरी सगळीं माणसें माझे बायकोजवळ बोलूं शकतात. राम्या गड्याला जी आडकाठी नाहीं ती मला आहे. लग्नांत बायकोबरोबर खेळखेळण्याबद्दल मजवर वडील माणसांनीं जबरदस्ती केली, आणि आज तिजबरोबर खेळायची मला चोरी झाली आहे! तिचं डोकं दुखत असेल तर मी चेपतां कामा नयें. तिच्या पायांतला कांटा काढायला दुसऱ्या कुणालातरी बालवाव लागतं. बरं वडीलमाणसांचा बोज राखण्याकरितां ही चाल असेल तर तसेंही दिसत नाहीं. परवा आई शेजारच्या ठमाकाकूकडे गेली होती. शाळेंतून घरीं आल्यावर दुसरं कोणी मोठे माणूस घरांत नाहीं असं पाहून मी तिला म्हटल, चल फरमर खेळायला, तर बेटी, घरांतून पळूनच गेली. तरी माझी अशी सभेला विनंति आहे कीं, लग्नांत ज्याप्रमाणें घास देणें सुपारी लपविणें, एकत्र स्नान करून एकमेकांवर पाणी उडविणें अशा सारख्या ज्या गोष्टी करतात त्याप्रमाणें त्या पुढेंही करण्याची परवानगी पतींना असावी. ”

बाळोबा नंतर एक तरूण पती पुढें आलें, तें म्हणाले उघड नाहीं तरी रात्रीं शय्यागृहांत हसण्या खिदळण्याला, थट्टा मस्करी करण्याला परवानगी वडील मंडळींची आम्हाला असते. परंतु बायकोला घेऊन फिरायला जायची चोरी जी अजून कांहीं घराण्यांतून आहे ती यापुढें उठविली जावी. आपल्या सहधर्मचारिणीला बाहेर फिरायला नेण्याचा प्रत्येक नागरिकाचा

जन्मसिद्ध हक्क आहे दुसरी गोष्ट आम्हांला नडते ती ही कीं, आमचे सासरे उठसूट बायकोला माहेरी बोलावतात. आज काय सासूबाई बाळंत झाल्या आहेत, उद्यां चिंगीचें लग्न निघालें आहे तर तेरवा गोदूचं डोहाळजेवण आहे. याशिवाय मंगळागौर, संक्रांत, वर्षश्राद्ध, दिवाळी, दसरा हे सण आमची ताटातूट करायला नेहमी पोलीस प्रमाणें सज्ज असतात. तरी माझी अशी सूचना आहे कीं, तरुणांचे लग्न झाल्यावर नवरा बायकोना पांच वर्षे एकत्र राहूं द्यावे अशा कामीं व्याह्याची भीड मुलाच्या बापानें धरूं नये."

या नंतर तिसरा तरूण सरसावला त्याचें वय २५ च्या पुढें होते तो म्हणाला,

"बायकांना पुरुषांच्या अर्धांग्या समजण्याची जी पद्धत पडली आहे ती अत्यंत घातुक आहे. हल्लीच्या बायका पुरुषांच्या कामांत नसती ढवळाढवळ करतात. आधुनिक तरुणी पुरुषाचे खिसे चांचपतांना त्यांतल्या पैशांना जरी हात लावीत नाहींत, तरी खिशांतले कागद पत्र काढून वाचल्याशिवाय कधीं रहात नाहींत. ते कुलपात ठेवावेत तर कुलूप उघडून द्या म्हणून हट्ट घेऊन बसतील. यामुळें घर हें कागद पत्रांचें सुरक्षित ठिकाण म्हणून राहिलेलें नाहीं. सरकारची झडती नेमस्तांचे घरीं तरी येत नाहीं पण ही झडती रोज येत असल्यामुळें राजकारणांत मी मवाळ असूनसुद्धां निर्धास्त राहिलेलों नाहीं. मला हल्लीं कोणाही स्त्रीवाचक प्राण्याबद्दल

पत्रांत अगर लेखांत चार अक्षरें लिहिण्याची चोरी झाली आहे. माझे नातेवाइकांना, मित्रांना अगर एखाद्या उपयुक्त संस्थेला मी मनिऑर्डर पाठविली कीं, आम्हाला जाब विचारला जातोंच. ऑडिटरच्या शंकेची भीति कोणच्याही संस्थेच्या चिटणीसाला वाटत नसेल इतकी मला घरच्या ऑडिटरची वाटत आहे. हल्लीं काळ बदलला असून बायकांचा सासुरवास पुरुषांना होऊं लागला आहे. घरांतल्या व्यवहाराची खातीं सोंपवून दिली, तरी राखीव खात्यांत त्या ढवळाढवळ करतातच. बरं इतके करून संसाराची जबाबदारी तरी घेतील कां ? मुळींच नाहीं. आम्हांला मित्र जोडावे लागतात, यांना दीर, जाऊ, सासू का नणंद खपत नाहीं. आणि आजार किंवा बाळंतपण आलं म्हणजे माणस जोडली नसली कीं, आयत्या-वेळीं कोण येणार ? पूर्वीं पुरुषांनीं बायकांना त्रास दिला असेल पण बायकांचा जो जांच पुरुषांना होतो आहे त्याकडे कोणी लक्ष देत नाहीं. तरी माझी अशी सूचना आहे कीं, नवरा बायकोच्या संसारात राखीव खाती कोणची व सोपीव कोणती याचा निकाल लागला पाहिजे म्हणजे पुरुषांचा जांच कमी होईल.''

यानंतर एक गृहस्थ उभे राहिले ते म्हणाले "शिक्षणानें आमच्या स्त्रिया जागृत झाल्या आहेत खऱ्या, परंतु त्यांची जागृती मुसलमानांतील जागृतीसारखी तापदायक झाली आहे. हक्काकरितां भांडणारांनीं कर्तव्य पालनांतही दक्ष असावयाला

नको कां ? शिवाय पूर्वीच्या स्त्रियांपेक्षां हल्लींच्या स्त्रिया जास्तच मत्सरी बनल्या आहेत. पुरषांनीं कोणाही स्त्री बरोबर संवाद केला तर आमच्या स्त्रियांना ते खपायचे नाहीं. त्या मात्र वाटेल त्या समाजांत जातील, वाटेल याच्याबरोबर हितगुज करतील, घरांत वाटेल तेव्हां येतील, वाटेल तेव्हां जातील पण पुरुषांनीं त्याबद्दल चकार शब्द उच्चारतां कामा नये. जर चुकून एकादा कडक शब्द तोंडावाटे बाहेर काढला, तर मग घरांत आदळ आपट कर, स्वयंपाकच बिघडव, अबोलाच धर किंवा यापुढें जाऊन घराबाहेर जाण्याचा धाक घाल किंवा मोठ्यानें रडून भेकून शेजाऱ्यांना जमवून त्यांची सहानुभूती ओढून घेऊन पुरुषाला खजील करण्याची पद्धत हल्लीं जी पडत आहे तिला लवकरच आळा न बसला तर आपली पुरुष समाजाची धडगत मला दिसत नाहीं असा इशारा मी देऊन खालीं बसतो."

या नंतर चवथे गृहस्थ पुढें आले त्यांनी संसार सुखाचा अनुभव दहा वर्षें तरी घेतला होता. ते म्हणाले, "हल्ली स्त्रियांना सरकारी अगर खाजगी नोकरी करण्याची चटक लागल्यानें संसाराचें मातेरे होऊं लागलें आहे. दोघेजण उद्योगाकरितां बाहेर पडल्यामुळें गृहव्यवस्थेकडे कोण पहाणार.? खाणावळीचा डबा आणवावा तर खर्च फार होऊन भिकार अन्न खावें लागतें. मनुष्य आहे, त्याला आजार हा येणारच. त्यावेळीं कुणी कुणाची शुश्रुषा करावयाची.? दमून

भागून घरीं यावें तर हसत मुखानें दारांत स्वागत करायला कोणी नसते, पैसा मिळतो खरा पण त्या पैशाने आमची घरें पाहून टाकून त्यांची हॉटेलें केलीं आहेत. सुख, शांती, समाधान याचें वसतिस्थान आज घर म्हणून राहिलेलें नाहीं.

दोघेहीजण कामावर गेल्यामुळें घरचा धनीपणा कुत्र्या-कडें अगर कुलपाकडें आला आहे. सकलकलाकुशल, सुग्रण पत्नी घरांत जेथें वावरावयाची त्या ठिकाणीं आज "बाई" कांहीं कांहीं घरांत वावरू लागली आहे. जेथें फुकट जाणारा प्रत्येक धान्याचा कण डब्यांत जाऊन पडावयाचा तेथें आज शेरावारी धान्य केरांत चाललें आहे. केराच्या टोपलींत कोणच्या गोष्टी जाऊन पडतील याचा नेम राहिलेला नाहीं. एकादे महत्वाचें पत्र, महाग औषधाच्या पुड्या, सुई दोरा, चमचे, डब्यांची झाकणें, सुंदर रेशमी रुमाल अगर चाकू या जिनसा गृहीणीच्या खास पेटींत न सापडता केराच्या टोपलींत सापडण्याचा संभव अधिक दिसूं लागला आहे.

खाण्याच्या जिनसांचीं तीच गत. लोणच्याच्या बरण्यांत आळ्यांची प्रजा वृद्धि, तिखटाच्या बरणींत जाळीं, कणकेशीं बरोबरीचें नाते लावून बसलेली रेव, एकीकडे आपणाला दिसेल, तर दुसरीकडे घरांत आणलेली भाजी दुर्लक्षांमुळें सडून जातांना आढळेल. असें प्रकार पाहून कुणाला दुःख होणार नाहीं ! दोघेजण पगार पैसा मिळावितात हें दिसतें पण घरांत जास्ती आलेला पैसा नोकरचाकर नासधूस करून कमी करतात. बाकीचा

खाण्यापिण्याची टीप न राहिल्यानें डॉक्टरच्या माड्या उठ-वण्यास जातो. त्यांतून जर कांहीं पैसे उरले तर संसार असमाधानाचा म्हणून रडकी पत्रें इष्ट मित्रांना लिहिण्याच्या कामीं खर्च होतात म्हणून माझी अशीं सूचना आहे कीं बायकांनीं होता होईल तों नोकरी धरूं नयें.

इतक्यांत एक पंचावन वर्षाचे पोक्त गृहस्थ पुढें सर-सावले. नाकावरचा खाली आलेला चष्मा नीट बसवून व थोडें खाकरून ते म्हणाले, " देशांत पुनर्विवाहाबद्दल पुष्कळ लिहिले व बोललें जातें. पण आमच्यासारख्या मध्यम वयाच्या पुरुषांना— कुणी मला म्हातारा म्हणतात. मी स्वतःला मध्यम वयाचा पुरुष म्हणतो— हल्लीं विधवा मुली मिळतात कोठें ? पुनर्विवाहाची इच्छा नाहीं अशी स्थिति हल्लीं नाहीं खरी, पण मुलाच्या बापाप्रमाणें विधवा मुली निर्लज्जपणें भलताच हुंडा मागतात. परवा आमच्या एका वकिलाला आपल्या पुनर्विवाही स्त्रिच्या नांवानें पांच हजार रुपये बँकेत ठेवावे लागलें, तेव्हां कुठें ती विधवा कुमारी लग्नाला उभी राहिली. आता आम्ही येवढें पैसे पुनर्विवाहाकरिता आणावयाचें कोठून? शिवाय अशी लग्नें रजीस्टर नव्या फॅशनप्रमाणें झाली कीं, बायकोला घट-स्फोटाचा हक्क मिळतो आणि मग पैसा व बायको हातची जातील म्हणून ती वागेल तशी तिला नाचूं द्यावे लागतें म्हणून नवऱ्याच्या घरांत टिकून राहाण्यांत सौख्य आहे अशी आधु-

निक स्त्रियांची खात्री होईपर्यंत लग्नसंस्था बंद करून हल्लीं झालेले विवाह रद्द करण्यांत यावेंत ! "

इतक्यांत एकजण ओरडला, " यापुढचे विवाह रद्द करा नाहींतर माझे पैसे पाण्यांत जातील ? "

दुसरा एक बावळट पति आपल्या मित्राला म्हणाला, " विवाह जर रद्द झाले तर माझी अवस्था मोठी कठीण आहे. माझ्या वडिलांच्या नांवावर मला त्या वेळीं मुलगी तरी मिळाली. आतां कायदेशीर विवाह बंद होऊन नुसती स्त्री पुरुषाची मैत्री प्रचारांत येऊं लागली तर माझ्या सारख्या दुधखुळ्याला एखादी मैत्रीण मिळण्याची आशाच नको."

नंतर एक तरूण काकूळतीनें म्हणाला " अहो अजून चार महिने देखील मी संसारसुखाचा अनुभव घेतला नाहीं म्हणून म्हणतो विवाहसंस्था बंद करण्याचा ठराव चार वर्षे तरी अजून पुढे येता कामा नये." इतके होईतों रात्र झाली तेव्हां सभेचे काम पुढील रविवारपर्यंत, तहकूब करण्यांत आले, पण पतीमंडळी घरी जावयास निघणार तोंच गॅलरीत नकळत बसलेल्या त्यांच्या स्त्रिया पुढें चालल्या होत्या तेव्हां ते दचकले व म्हणाले, " यांना कुणी आमच्या सभेची बातमी दिली." आता घरीं आमचे वाभाडे निघतील.

पुरुष मंडळी घरीं गेल्यावर त्यांची हजेरी त्यांच्या 'घरच्यांनीं' चांगलीच घेतली.

एकजण म्हणाली " एवढा बायकोचा सासुरवास वाटतो

कां ?— अयर्यी मला तस कां अगोदर सांगितल नाहीं? मला काय करायची तुमचीं पत्र वाचून? माझं काम मला काय थोडं आहे? आणि तीं पुरुषांची वाईट अक्षरांनीं लिहिलेलीं पत्र वाचण्यांत आनंद तरी कुणाला वाटेल? म्हटलं तुमच्या विचारांशीं समरस व्हावं, तुमचीं सुख दुःख माहीत व्हावीत म्हणून कांहीं मधून मधून पहात असते त्याबद्दल समाधान मानायचं राहिल आणि उलट भर सभेंत कागाळी करता ? कांहीं मनाची नाहीं तरी जनाची बाळगायची होती— मी नाहीं हो आतां तुमच्या कागदांना हात लावणार—पण नाहीं काय म्हणून ! एवीं तेवीं तुम्ही बायकोच्या नांवानें ओरडणारच पण ओरडण्याला पूर्ण संधी मिळावी म्हणून मी आतांपासून सर्वच तुमची पत्रें वाचणार आहे हो, सांगून ठेवते. ”

दुसरी म्हणाली “जे ऐकाव तें नवीनच. मला काय पांच वर्षे माहेरी न पाठविण्याचा बेत चालला आहे वाटतं? ते कांहीं चालणार नाहीं. माझ्या बाबाशीं गांठ आहे. ते आहेत जमदग्नीचा अवतार, तुम्हांला भंडावून सोडतील. तुम्हीं जर मला सासरी पांच वर्षे डांबून ठेवणार असाल तर दिवाळीला जाईन ती पुन्हां यायचीच नाहीं. आम्ही बायका पण एक लौकरच सभा भरवणार आहोंत त्यांत मी असाच ठराव आणीन कीं, यांपुढें पुरुषांनीं बायकाकडे नांदायला जावं ”

तिसरी आपल्या पतीला म्हणाली “ तुम्ही पुरुष म्हणजे महा आंतल्या गांठीचे. माझी आपली वेडी समजत कीं,

इतर पुरुष कसेंहि असलें तरी आमच्या इकडचा स्वभाव मोठा उदार व निर्मत्सरी पण माझा संशय आज पार फिटला. मी सभेंत जाते, वादविवाद करते, पुरुषांत जरा मन मोकळेपणानें बोलते तें आपणाला खपत नाहीं हें मला कां नाहीं सांगितलं? माझ्यावर जुन्या म्हाताऱ्या टीका करतात. पण मी तुमच्या जिवावर आजपर्यंत कुणाला भीक घालीत नव्हते. पण आज तुमचें भाषण ऐकून चकितच झालें. आपण दोघांनीं आठ वर्षें संसार केला पण मनें नाहींना अजून जमली. पण मी आपणाला असें विचारते कीं, मी जरा मोकळी चाकळी वागलें तर एवढं कां मनाला लावून घ्यावं? तुजवर प्रेम आहे असं म्हणता मात्र पण मन कांहीं शुद्ध ठेवात नाहीं. आपल्या बायकोसंबंधीं असं बोलणाऱ्यांची लोक काय बरें किंमत करतील? मी आपल्याला नको ना? ठीक मी जाते आपली माझ्या मैत्रिणीकडे रहायला."

चवथी म्हणाली "काय बाई मी सभेंत ऐकलं ते खरचं वाटेना, मी नोकरी करून तुम्हांला मदत करते त्याबद्दल चार अभिमानाचें शब्द सांगायचें राहिलें आणि रडगाणें चालविलं होतं. अहो मी जर पन्नास साठ रुपये मिळवून न आणते तर तुमच्या त्या चाळीस रुपयांत चांगला संसार कसा झाला असता? असलं सुंदर घर, रोजचा टाईम्स नित्याची हजामत, तीनदां चहा आणि सिगारेटच्या दोन पेट्या कोठून मिळत्या? कांहीं विचार करा. काय बाई हल्लीं मनुष्यांची

सुखेंच दुखूं लागलीं आहेत. मी तुमचे पूर्वींच्या बायकांसारखे पाय चेपीत नसेन, आंथरूण घालून ठेवीत नसेन, तुमच्या अगोदर उठत नसेन किंवा उष्टया ताटांत जेवीत नसेन पण बायको जर मिळवती पाहिजे तर या गोष्टी कशा साधतील ? — बाकी या वाचून आपले कांहीं एक आडलेलें नाहीं. पण नवरेपणा गाजवितां येत नाहीं म्हणून वाईट वाटत असेल नाहीं ? इतकें दिवस बायकांवर हक्क गाजवून घेतलेत पण आतां ते दिवस विसरा मी कांहीं नोकरी तुमच्या म्हणण्यानें सोडणार नाहीं.

" दोघांनीं नोकरी केल्यामुळें घर नीट रहात नाहीं हे मी कुठें नाकबूल करते ? पण त्या करतां पुरुषानें पाहिजे तर घर सांभाळावे. ब्रम्हदेशातले पुरुष नाहीं कां घरें सांभाळीत. स्त्रिया पुरुषांच्या इतक्या सुशिक्षित व स्वावलंबी होईपावेतो घर साभाळण्याचा मक्ता पुरुषांनीं घ्यावा असा ठराव बायकांच्या सभेंत लवकरच येणार आहे. त्या ठरावाची अंमलबजावणी तुम्ही केली नाहीं. तर आम्हांला सत्याग्रह करावा लागेल. सत्याग्रहाची कल्पना मूळ निघाली बायका पासून सत्याग्रही युद्धाचें ज्ञान आम्हाला उपजत असते तेव्हां आमचा पराभव करणें पुरुषांना जड जाईल. "

पांचवी आपल्या पुनर्विवाहित पतीला म्हणाली " काय ! माझ्या नांवानें पांच हजार बँकेत ठेवले त्याला हुंडा म्हणता ! मला काय पांच हजाराला विकत घेतली होय !

मी काय तुमची गुलाम आहे वाटतं ? असं वाटत असेल तर घ्या आपलं मंगळसूत्र व बँक–बुक मला वाटलं तुम्ही ते रुपये मजवरच्या प्रेमानें दिलेंत. तुम्ही प्रेमाने दिलेत मी प्रेमानें घेतले आणि आतां पुनर्विवाहित पत्नीच्या नांवानं ओरडता? खरंच माझ्या मेलं नशिबी सुखच नाहीं, तेव्हां तशी गत आतां अशी गत! आपला ठराव मागें घ्या म्हणजे मजवर प्रेम आहे असें समजेन नाहींतर प्रेम नाहीं तेथें रहाणे लोचट-पणाचे आहे. पहा विचार आपला. आताच्या बायका अशा तशा नाहींत ! साम्राज्य सरकारला आम्ही त्राही भगवान करून सोडतो. त्या काय तुमच्या गुलाम होण्याकरिता? दुसऱ्या विवाहाचे वेळीं हे जर शहाणपण आम्हाला आले नाहीं तर आमच्या सारख्या मूर्ख आम्हींच. ”

अशा रीतीनें घरांत प्रत्येकाला तंबी मिळत गेल्यानें व पुढच्या सभेच्यावेळीं बायकांनीं सभागृहापुढें सत्याग्रह केल्यामुळें एकामागून एक पुरुषानें आपला ठराव मागें घेतला व पळता पाय काढला यामुळें सभाध्यक्षांना सभा बेमुदत तहकूब करावी लागली.



## मुक्ताफळांचा लाभ

आज मनाजोगती प्रजा हातून निर्माण झाल्यामुळें ब्रम्हदेव खुशींत होतें.

हंसाच्या नायकाने विनंती केली.

" सहस्रावधि योजनांचा आकाशांतून स्वामी कार्यार्थ प्रवास केल्यावर आपले सेवक गण श्रमी होतात."

" मग ? " ब्रम्हदेवांनी सुखसमाधीतून जागें होऊन प्रश्न केला.

हंसाकरितां आपण जर कमलवनाचे एखादें सुंदर सरोवर निर्माण करून द्याल तर- "

" बरें आहे हिमाचलाचे उत्तरभागीं तुम्हांला एक विस्तीर्ण जलाशय क्रीडा करण्याकरितां असें निर्माण करून देतो कीं देवांनीं सुद्धां तुमच्या भाग्याचा हेवा करावा."

दुसऱ्या दिवशीं आपल्या स्वामींची सेवा केल्यावर हंसाचा कळप हिमाचलावर येऊन उतरला तो उत्तरेच्या बाजूला मनुष्य वस्तीपासून फार दूरवर असे एक विस्तीर्ण सरोवर त्यास दिसलें. ब्रम्हदेवांनी मनोबलानें तें एका क्षणांत निर्माण केलें म्हणून त्या जलाशयाचें नांव त्यांनीं मानससरोवर ठेवले. या ठिकाणीं ते हंस पाळीपाळीनें जल-क्रीडेकरितां येत कालांतरानें त्यांत सहस्रदल—कमलें निर्माण झालीं. त्यांच्या सुगंधानें असमंतातला सर्व प्रदेश दरवळुन

जावा. हंसाला जल क्रीडेनंतर फलाहाराकरितां कमल वनातील बिसतंतू यथेच्छ मिळत.

एके दिवशीं पांच पंचवीस बदकें फिरत फिरत त्या जलाशयाच्या काठीं आली. व त्या निर्मल जलाशयांत तीं शिरणार तोंच एका हंसानें त्यांस अडवून म्हटलें.

"भूलोकीचीं चिखलानें भरलेलीं अनेक डबकीं आहेत तीं सोडून तुम्ही इकडे कशाला आला? हें सरोवर ब्रम्हदेवानीं खास आमच्याकरितां तयार केलें आहे."

हंसाचें भाषण ऐकून एक बदक पुढें सरसावलें. व म्हणालें

"कां बरें? आम्ही ज्याअर्थी भूलोकात राहणारे त्या अर्थी या लोकींच्या सर्व पदार्थावर आमचा हक्क आहे. आम्हांला अडवणें तुम्हांला शोभणार नाहीं. शिवाय तुमच्यांत आणि आमच्यांत फरक काय आहे तो दाखवा पाहूं? तुमचा शुभ्र वर्ण आणि आमचा काय कृष्ण वर्ण आहे? तुमच्या चोंचीप्रमाणेंच आमच्याहि चोंची आहेत. तुमच्याप्रमाणेंच आमचेहि पाय जलविहार-क्षम आहेत. तुम्ही म्हणाल हंस बिसतंतू खातात, आम्हांला सुद्धां असें सुग्रास भोजन मिळेल तर तें नको आहे थोडेंच?"

बदकांनीं आपली बरोबरी केलेली पाहून तो हंसश्रेष्ठ मनांत हंसला आणि उदार मनानें त्यानें त्यांना मानस सरो-वरांत विहार करण्याची परवानगी दिली व बजावलें कीं, "ह्या सरोवरावर हक्क सांगण्यास यक्ष, किन्नर, गंधर्व यापैकीं

कोणी आले तर आम्हांबरोबर तुम्हीही या सरोवराचें रक्षण करण्यास आलें पाहिजे."

हंसाच्या इशारतीचा अर्थ न समजतांच बदकांनीं "हो हो" करून त्या जलाशयांत प्रवेश केला. पण हंसा-प्रमाणें त्यांचें सामर्थ्य नसल्यामुळें व त्याची अभिरुचि भिन्न असल्यामुळें तीं बदकें सरोवराच्या कांठाकाठानेंच हिंडत व तेथला चिखल चिवडून मासोळ्या खाऊन पुष्ट होत.

एक दिवस चित्ररथ गंधर्व आपल्या अप्सरासह आकाश मार्गे विमानांतून जात असतां त्याची नजर त्या सुंदर मानस-सरोवराकडे गेली. त्या जलाशयाच्या सौंदर्यानें तो मोहित होऊन त्यानें तें आपले सुदीर्घ आकाशयान त्या सरो-वराकाठीं उतरविले. गंधर्वांना साजेशा अशा नानाविध जल-क्रीडा केल्यावर त्यानें पुनरपि काठावर येऊन विश्रांति घेतली त्या वेळीं गंधर्व पत्नी म्हणाली. "या सरोवरांतील ती सहस्रदल कमले सुगंधानें व शोभेनें सुरलोकीच्या कमलांस लाजविणारी आहेत. मला रोज एक सहस्र कमले पुजेकरतां पाहिजेत."

आपल्या पत्नीच्या तोंडातला शब्द कधीं खालीं पडूं न देणारा तो गंधर्वराज तत्क्षणीं सेवकांस म्हणाला "या सरोवरांतील सहस्र कमलें दररोज पूजेच्यावेळीं राणी साहेबांना आणून देत जा."

गंधर्वांचें आगमन, त्यांचा तो जलविहार, कमलांचा त्या दिवशीं झालेला अपहार हंसांना पसंत पडला नाहीं.

आज नाहीं उद्यां आपल्या स्वच्छंदी विहाराला हे गंधर्व अडथळा आणल्याशिवाय राहणार नाहींत. तेव्हां आपल्या हक्कांचें संरक्षण कसें करावयाचें याचा विचार ते करूं लागले. भवति न भवति पुष्कळ होऊन प्रत्यक्ष उपसर्ग पोंहचेपर्यंत गंधर्व काय करतात हें निकटपणें पहावयाचें असा हंस-मंडळानें निर्णय केला.

दुसरे दिवशीं गंधर्वराजाकडून एक सहस्र कमलें नेण्याकरिता एक दूत त्या मानससरोवरावर आला तो त्याला बरीचशीं कमलें हंसांनीं त्यांतील तंतू खाऊन विसकटून टाकलेली आढळली. तीं पाहून तो हंसांना म्हणाला " हे पहा आमच्या राणीसाहेबांनीं रोज सहस्र कमलें पूजेकरितां येथून घेऊन येण्या-विषयीं मला आज्ञा केली आहे. तरी मी तुम्हांला सूचना देऊन ठेवतों कीं, तुम्हीं कोणीहि या सरोवरांतील कमल विभा-गांकडे फिरकूं नका. आमच्या राणीसाहेब आहेत फार कडक त्यांच्या कमलांचा नाश झालेला त्या मुळींच सहन करणार नाहींत. फुकट तुह्माला त्रास होऊं नये म्हणून मी आज इशारा दिला आहे.

हें दूताचे विलक्षण बोल ऐकून हंसाचा नायक म्हणाला " हे गंधर्व दूता, तुझ्या अज्ञानाची आम्हाला कींवच येते. अरे ही कमलें तुझ्या राणीसाहेबांची नाहींत. जगांत जी जी म्हणून सुंदर वस्तु आढळेल ती ती आपलीच सम-जावयाची वाईट संवय तुझ्या राणीसाहेबांना लागली आहे.

त्यांना आमचा निरोप कळवा कीं, ह्या सरोवराकडे फिरकण्याचें तुम्हाला कांहीं कारण नाहीं हें सरोवर पद्मयोनी ब्रह्मदेवाच्या कृपेनें आम्हा हंसांना प्राप्त झालेलें आहे व त्यांतील ही सुंदर कमलें आमचेच उपयोगाकरितां आहेत. तेव्हां आमचे परवांनगी शिवाय एकही कमल तुम्हांला नेतां येणार नाहीं "

गंधर्व दूत हें हंसराजाचें भाषण ऐकून म्हणाला,

" मी तुम्हांला मित्रत्वाचा सल्ला दिला तो तुम्हांला मानवला नाहीं. उद्यां तीक्ष्ण वृत्तीचे दुसरे दूत येतील व उद्धटपणाबद्दल तुम्हांला कठोर शिक्षा करतील आणि कमलें जबरदस्तीने घेऊन जातील तेव्हा कळेल " असें म्हणून त्याने आकाशमार्गे उड्डाण करून गंधर्व नगरींत प्रवेश केला.

" हंसांना तुम्ही आजच्या आज त्या मानससरोवरावरून हाकून लावा " गंधर्व पत्नीनें आपल्या पतिदेवाला हुकूम केला.

" ठीक आहे जशी देवींची आज्ञा " असें म्हणून चित्ररथ आपल्या आसनावरून उठला तो त्याची पत्नी चिडून म्हणाली " माझें बोलणें पुरें ऐकून न घेतां चाललात कोठे ? मला तेथील सुंदर कमलें पूजेकरितां पाहिजे आहेत— "

" त्या सरोबरांतील कमलें आणण्याकरितां भूलोकीं मी एक दूत पाठविला होता तों हंसांनीं त्याला प्रतिबंध केला. ह्या अपमानाची भरपाई होऊन मला दररोज सहस्र कमळें मिळालीच पाहिजेत "

" मग त्याकरितां तर मी भूलोकांत जातों आहें. तुमचें काम दूताकरवीं करवून घेणारा मी सामान्य पती नाहीं. मी पत्निनिष्ठ पती आहे " असें म्हणून गंधर्वराज तेथून निघाले.

आकाशयान मंडलावर मंडलें घेत मानस सरोवराच्या कांठीं उतरलें. गंधर्वराज स्वतः आलेला पाहून हंस मंडळ त्याचे भोंवतीं जमा झालें. इतक्यांत हिंडत हिंडत बदकेंही तेथें पोंहचलीं. तेथें विहार करणारे सर्व पक्षिगण जमल्यावर चित्ररथ गंधर्वानें कांहींसें समजुतीचें व कांहींसें धाक दाखविणारे भाषण केलें. तो म्हणाला–

" कमल तंतू खाऊन कमल वनांचा नाश करावयाचा तुमचा अनिष्ठ उद्योग आतां या पुढें तुम्हाला सोडून द्यावा लागेल. शंभर कमलें नासून तुम्हांपैकीं एकाचें तरी पोट भरतें कां ? या पेक्षां या तळयांत ज्या मासोळ्या भरपूर आहेत. त्या खाऊन तुम्ही पुष्ट कां होत नाहीं तुम्हाला बजाऊन सांगतो. कीं, या पुढें या सरोवरांत एकाहि कमलाला तुम्ही चोंच लावाल तर मी तुमचें पंख असें उपटून टाकीन " असें म्हणून त्यानें तेथलें एक उचललें व त्याचे पंख उपटण्याचा आव आणला. आपल्या प्राणावर बेतली हें पाहून तें बदक काकुळतीस येऊन म्हणालें.

" सोडा, देवा, सोडा मला आम्ही कधींही कमल तंतु खात नाहीं. ते आमचें भक्ष्यच नव्हे " असें काकुळतीचें

भाषण ऐकून चित्ररथाने त्या बदकाला सोडून दिलें. इतक्यांत बदकांचा नायक पुढें सरसावला व म्हणाला. ”

“ हे त्रैलोक्याधिपते गंधर्व राज, आम्ही अखिल भारतीय बदक मंडळातर्फे आपणास नम्रापणें कळवितों कीं, हें हंस निराळे व आम्ही बदकें निराळीं. यांच्या आमच्या अभिरुची एक नाहींत. आम्ही डबकनिवासी. आम्हांला काय करावयाची तुमची सहस्रदल कमलें तुमची जर इच्छा असेल, तुम्ही जर आज्ञा कराल तर आमचे बदक मंडळ इकडे फिरकणार सुद्धां नाहीं.

बदकांची ही फितुरी पाहून चित्ररथाला आनंद झाला. प्रसन्न होत्साता तो हंसांना म्हणाला “ तुमचे भाऊबंद, शेजारी काय म्हणतात हे नीट ऐका. त्यांचें जवळून अक्कल शिकून त्या कमलवनाचा नाद कायमचा सोडून द्या, त्यात तुमचे कांहींएक नुकसान नाहीं. माझें जरा ऐका. ”

बदकांनीं कांहीं कालापूर्वी आपल्याशीं बरोबरीचें नातें लावून कठीण प्रसंग येताच आपला विभक्तपणा प्रगट करतात हें पाहून हंस समुदायाला त्यांची चीड आली. पण आल्याप्रसंगाला त्यांना तोंड देण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें त्यांनीं गंधर्वराजाला निर्वाणीचे सांगून टाकलें कीं,

“ ह्या जलाशयांत विहार करण्याचा आमचा सेवासिद्ध हक्क आहे कारण हंसाकारितांच हे सरोवर व त्यांतील सुंदर कमळे ब्रम्हदेवांनीं निर्माण केलीं आहेत. तुम्हांला येथें येण्याचे

कारणच नाहीं हंस मंडळाचें तुम्हांला निक्षून सांगणें आहे कीं, तुम्ही अगर तुमचे सेवकगण कोणीही येथें केव्हांही आमच्या खास परवानगी शिवाय येतां कामा नये "

ह्या सडेतोड उत्तरानें चित्ररथाचे डोकें फिरून गेलें त्यानें डोळे लाल केले. ओठ थरथर कांपत असतां तो गर्जुन म्हणाला

" ऐका या चित्ररथ गंधर्वाची आज्ञा. आज पासून कोणीही हंसानें ह्या मानस सरोवरांत पाय ठेवतां कामा नये व एकाही कमलास स्पर्श करतां कामा नये व जो कोणी असें करण्यास धजेल त्याचे क्षणार्धात पंख उपटून टाकण्याची आज्ञा मी माझे सेवकास देत आहे उद्यां सकाळीं येथें गंधर्व राजांची चौकी ह्या मानस सरोवराचें काठीं बसलेली तुम्हाला दिसेल.

इतक्यांत एक लुब्रे बदक पुढें होऊन म्हणाले.

" राजाधिराज आमच्या बदक मंडळाचा कोणीही गंधर्व राजानिष्ठ सभासद कमल विभागाकडें फिरकणार नाहीं. इतकेंच नव्हें तर एकादें तुटून पडलेले शीळे कमल वहात आमचे जवळ आले तरी आम्ही त्याला बगल देऊन पुढें निघुन जाऊं. मात्र चिखलांत ज्या मासोळ्या राहतात त्या टिपून घेण्याची सनद राजाधिराजांनीं आम्हा बदक ज्ञातीला वंशपरंपरा बहाल करावी "

चित्ररथाला बदकांचा हा तोंडपूजेपणा आवडत

नव्हता. त्याचें सर्व लक्ष मानी हंसाकडे होते तो त्यांना उद्देशून म्हणाला

" असा समजूतदारपणा मला जो दाखवील त्यांना मासोळ्या टिपण्याची परवानगी ही मोठ्या खुषीनें देऊन माझ्या ह्या देणगीचा तुम्ही स्वीकार करा. पण लक्षांत ठेवा जर कां कोणी माझ्या त्या कमलांना हात लावला तर मी कोणाची उपेक्षा करणार नाहीं. आपल्या कुळाचा समूळ उच्छेद होऊं नये अशी इच्छा करणारांनी माझी आज्ञा उलंघण्याचे धाडस करूं नये. "

आपल्या भाषणानें हंसांना चांगला धाक बसला अशी खोटी समजूत करून घेऊन तो गंधर्वराज विमान मार्गे निघुन गेला व थोड्याच अवकाशांत त्या सरोवराच्या कांठावर गंधर्व दूत आपल्या लष्करी वेशांत दाखल झाले.

× + ×

लगेच हंस मंडळाची तातडीची सभा भरली त्यांत एक हंस उठून चवताळून म्हणाला.

" ह्या जलाशयांत विहार करण्याचा आमचा सेवा--सिद्ध हक्क आहे. चित्ररथ गंधर्वांचा असेल राजा. पण त्याला आमचे वाटेच जाण्याचे कांहीं एक कारण नाहीं. आपण ब्रम्हदेवाकडें या गंधर्वांच्या चढेल पणाबद्दल दाद मागितली पाहिजे. "

तेथला दुसरा हंस जरा थंड डोक्याचा होता. त्याची ख्याति हंस मंडळांत शहाणपणाबद्दल होती. तो म्हणाला " असं पहा नुसते गरम बोलून हा प्रश्न सुटणार नाहीं. अहो चित्ररथ काय आणि ब्रह्मदेव काय ? हे दोघेही देव-लोकींचे महान् अधिकारी. सेवकांचा प्रश्न घेऊन ते आप-आपसांत वितुष्ट आणतील ही गोष्ट संभवनीय नाहीं. तेव्हां माझा सल्ला असा आहे कीं आपण हें सरोवर सोडून द्यावे, किंवा मरणास तयार व्हावें. वाटल्यास बदकांची हीन मनो-वृत्ति अंगिकारावी. व चिखल चिवडीत बसावें.

तिसरा हंस पुढें सरसाऊन म्हणाला,

" मरणाला तयार व्हावें हेच माझ्या समजुतीने युक्त होय. बदकाचे अनुकरण करावयाचें तर हंस हे नांव प्रथम टाकले पाहिजे. "

बरीच भवती न भवती होऊन आपला नित्याचा क्रम सोडावयाचा नाहीं, काय व्हावयाचें असेल तें होवो असा हंसाच्या शीलाला उचित असा ठराव त्यांच्या सभेत पसार झाला.

आपला हक्क व्यवस्थित रितीनें बजावण्याकरितां हंस मंडळानें आपल्यापैकीं दोघांदोघांना कमलविभागाकडें पाठवा-वयाचें ठरविलें. त्या दिवशीं रात्रीं हंसकुटुंबियांनी एकमेकांचीं शेवटची भेट घेण्यांत व प्रेमानें बोलण्यांत घालविली. एक हंसी जेव्हां आपल्या पिलांस म्हणाली, कीं मी, प्रथम सत्या-ग्रहास जाणार. तेव्हां तिचें शावक म्हणाले, " आई, तें कांहीं

नाहीं. कमलांतील बारीक बारीक तंतू तूं परवापर्यंत आमचे चोंचींत घालून नंतर खात होतीस नाहीं का ? आज आम्ही मुलें कमलतंतु खाण्यास प्रथम सरसावणार. ''

मुलांचा तो सात्विक हट्ट पाहून हंसीच्या डोळ्यांतून धन्यता व विरह दुःख यांचें संमिश्र अश्रू वाहूं लागलें. सद्-गदींत स्वरानें ती आपल्या पतीला म्हणाली—

"ऐकलं कां मुलें काय म्हणतात तें ? हंसाच्या कुलाला शोभतील अशींच मुलें आपल्या पोटीं आली नाहीं कां ? आपण देखील सुंदर सुंदर कमलतंतु तोडून आणून आम्हांला प्रथम देत आला म्हणून आपले अगोदर कमलतंतु भक्षण करण्याचा आमचा हक्क बजावण्याकरितां आम्हांला प्रथम पुढें जाण्याची परवानगी मिळाली पाहिजे ''

दुसऱ्या दिवशीं सकाळीं हंस नायकानें कमल विभागा-कडे जाण्याकरितां एक हंसाची जोडी पाठविलीं. नेहमींच्याच सुंदर डौलदार गतीनें ही जोडी पोहत पोहत कमल वनात शिरली. त्याबरोबर गंधर्व राजाच्या दूतानीं त्यांना पकडले व त्यांचे पंख उपटून त्यांस कांठावर फेकून दिलें.

हा भीषण देखावा पहातांच बदकें तेथून पळालीं एका मागून एक अशा हंसांच्या जोड्या कमळ वनांत शिरूं लागल्या व गंधर्व दूत त्यांचें पंख उपटून त्यांना कांठावर फेकूं लागले. रक्तबंबाळ झालेल्या घायाळ हंसांचा तो ढीग पाहून हंस-नायकाच्या निधड्या छातीस यत्किंचित् तरी शंका शिवली

कां ? मुळींच नाहीं. तो आपले मन घट्ट करून हंसाच्या सत्याग्रही जोड्या पाठवितच राहिला. इतक्यांत गरूडाची स्वारी आकाश मार्गें सहज चालली होती. तो भयानक देखावा त्याच्या दृष्टीस पडतांच तो एकदम खालीं उतरला. हंसनायकाकडून त्यानें सर्व हकीगत समजुन घेतली व आपले सुदीर्घ पंख पुनश्च उभारून तो वायुवेगानें ब्रम्हदेवाकडे निघून गेला.

ब्रम्हदेव आपल्या कर्तव्यांत निमग्न होते. गरूडानें मोठ्या आवेशानें व कळकळीनें मानससरोवरावरचा तो भयंकर प्रकार त्यांना निवेदन केला. त्यांनीं ताबडतोब इंद्राला निरोप धाडून चित्ररथ गंधर्वाला बोलावून घेतले. तो आल्यावर ब्रम्हदेव त्याला रागानें म्हणाले,

" भूलोकी जाऊन माझ्या प्रजेला व्यर्थ उपद्रव देण्याचे तुला काय कारण होते ? जलक्रीडेकरितां आकाश-गंगा काय कमी विस्तीर्ण आहे. "

ब्रम्हदेवाचा क्रोध त्याच्या डोळ्यांतून ठिणग्याच्या रूपानें बाहेर पडत होता तो पाहून चित्ररथाची बोबडीच वळली. कसेतरी मन स्वस्थ करून तो कांपत कांपत म्हणाला, " आपण म्हणता त्याप्रमाणें मी मानस सरोवराकडे पाहिजे तर जाणार नाहीं. "

" तूं यापुढें जाणार नाहींस हे समजलं, पण तुझ्या दूतानीं माझ्या प्रजेची जी भूलोकीं हिंसा चालविली आहे, त्याचं निराकरण प्रथम झालं पाहिजे. " असें म्हणून ते

उठले व त्यांचें मागोमाग तेथील सर्वच मंडळी उठून मानस-सरोवरावर आली.

रक्तबंबाळ झालेले असंख्य हंस, लोळा होऊन पडलेलें पहातांच देवगणांनीं अश्रू ढाळले इंद्रानें विनंती केली कीं, आपल्या या निष्टावंत सेवकांची काया पूर्वीप्रमाणें करा. ब्रह्मदेवानीं आपले तपोबल खर्ची घालून सर्व हंसाना स–पक्ष करून त्यांची काया पूर्वी पेक्षाही जास्त सुंदर करून दिली तेव्हां पासून त्या हंसाना राज–हंस ही पदवी प्राप्त होऊन त्यांचे पंख कांचनाच्या तेजानें चमकूं लागले. ब्रह्मदेव हंसांच्या नायकाला म्हणाला चित्ररथाचा बंदोबस्त मी केला आहे. तुह्मी ही हकिकत माझे कानावर अगोदर घालता तर हा प्रसंग आला नसता.

" आम्हाला **आमचा हक्क स्वावलंबनानेच प्रस्थापित करावयाचा होता.** चित्ररथाचा बंदोबस्त आपण केला खरा पण या उन्मत्त गंधर्वाना शिक्षा अशी कोठें झाली ? "

" होय ! हंसनायका तूं म्हणतोस तेहि खरें आहे. अपराधी लोकांना शिक्षा न करणें हे अधिकारी पुरुषांना दूषणच होय. या कामांत गंधर्वांनीं घोर अन्याय केला म्हणून मी त्यांस असा शाप देतो कीं " गंधर्व हें या लोकांत पतन पाऊन समुद्रकीटक होऊन राहतील.

ही ब्रम्हदेवाची शापवाणी ऐकून **चित्ररथ** घाबरून म्हणाला, " भगवन् क्षमस्व, अपराधाबद्दल शिक्षा व्हावी हे

योग्य असलें तरी ती अनंत काळपर्यंत नसावी म्हणून आमचा उद्धार पुनरपि केव्हां होईल याचेहि या शापांत निवेदन करावें."

ब्रह्मदेव म्हणाले ऐका "माझ्या शापाप्रमाणें गंधर्व हे मौक्तिक–कीटक बनून समुद्र तळीं राहून मुक्ताफळें निर्माण करण्याचे काम त्यांना देण्यांत येईल. ज्या हंसाचा त्यांनीं अपराध केला त्यांचे भक्षणाकरितां मुक्ताफळे या गंधर्व कीटकांनीं तयार केल्यावर त्यांचा उद्धार होऊन ते गंधर्व नगरींत प्रवेश करतील"

आपल्या करितां मुक्ताफळें निर्माण करण्याची शिक्षा गंधर्वांना मिळालेली पाहून हंसांना समाधान झाले व आपण निर्माण केलेल्या मुक्ताफळांची स्तुती त्रैलोक्यांत होणार म्हणून गंधर्वही दुःखांत सुख मानूं लागलें.

मोत्यें जी इतकी सुन्दर तेजस्वी व डौलदार दिसतात याचे कारण गंधर्व ती तयार करीत असतात.



# मेधाव्रताचा शोध

( रावणी राज्याचा आधार )

" बाहेर कृषिवल मंडळी अंगणांत येऊन बसली आहेत. आपली गांठ घेऊं इच्छितात " असे मेधाव्रतांना त्यांच्या सत्वशील पत्नीनें येऊन सांगितलें "

" मंडळींना म्हणावे आपण बसावें मी पोथी आवरून आलोंच " असें म्हणून लिहून झालेलीं ताडपत्रें त्यांनीं एकत्र जमा केली व अगोदर लिहून ठेवलेल्या ताडपत्री पोथ्याजवळ ती केळीच्या सोपटानें बांधून ठेवून दिली. नंतर हातांत कृष्णाजीन घेऊन ते आपल्या पर्णकुटिकेच्या दारांतून लवून बाहेर पडले व आंगणात आले. तेथें तेथल्या निर्मल भूमीवर कृषीवल मंडळी बसली होती. मेधाव्रताची ती भव्य प्रशांत व तेजस्वी नेत्रांनीं विलसणारी मूर्ति पाहून " आकृति विशेषेषु आदरः पदं करोति " या न्यायानें पाहुणे मंडळी एकदम उभी राहिली. अतिथींचे स्वागत करतांना तपस्वी मेधाव्रत म्हणाले.

" आपल्या आगमनानें हा आश्रम धन्य झाला आहे. आपण मंडळी बसा कीं. "

" हे मुने आपण बसल्यावर आम्हीहि बसूं. " मेधाव्रताने कृष्णाजीन भूमीवर पसरून त्यावर ते बसले व मंडळींच्या आगमनाचे प्रयोजन त्यानीं विचारलें,

" मुने ह्या राक्षसाचा उपद्रव आम्हांला फार झाला आहे."

एकजण केविलवाण्या आवाजांत म्हणाला,

अहो वर्षभर आम्ही कष्टानें धान्य तयार करावें आणि कोठारांत आणून ठेवावें तों राक्षसांची टोळी येते आणि त्याची लूट करून घेऊन जाते." दुसरा म्हणाला, " आमच्या घरांत सुंदर वस्तु म्हणून हल्लीं राहात नाहीं इतकेंच नव्हे तर आमच्या स्त्रीयांना हल्लीं सुरक्षित स्थान म्हणून राहिलेलें नाहीं. एकाएकीं आकाशांतून विमान येतें त्यांतून चार पांच राक्षस येतात आणि आमच्यातल्या सुंदर स्त्रिया घेऊन पुनश्च आकाशांत जातात." तिसऱ्यानें तक्रार केली. " अस्सें, मग ते देव गंधर्व तर नाहींत. पण देवांच्या घरीं अप्सरा काय कमी पडल्या आहेत. इंद्रादि देवांची ही जर दुष्कृत्यें असतील तर विशेष तऱ्हेची तपस्या आम्हांला करावी लागेल"

" देव नाहींत हो ते, राक्षस आहेत. आम्हांला अशी बातमी लागली आहे कीं, फार दूरवर एका बेटांत लंका नावांची नगरी आहे तेथें महान् पराक्रमी रावण राजा राज्य करतो त्याचे चौदा-हजार सैनिक दंडकारण्यांत राहून येथल्या प्रदेशांतून धन-धान्य जमा करून लंकेत पाठवितात. याच रावण राजा करितां आमच्या स्त्रिया विमानांतून ते घेऊन जातात. ह्या राक्षसापुढें आमचे कांहीं चालत नाहीं. आपण

महामुनी आहां आपल्याला मंत्र विद्या अवगत असेल तरी आपण मंत्र जपून ह्या दुष्टाचा नाश करावा म्हणून आम्ही आलो आहे."

" आपल्या दु:स्थिती बद्दल मला फार वाईट वाटतें आपण धीर धरा मला या बाबत काय करतां येईल त्याचा विचार करून तुम्हांला सांगतों. परमेश्वर दुर्बलाचा रक्षक आहे. तोच आपले संकट निवारण करील.

मेधाव्रत मुनींना रावणाच्या सेवक राक्षसांच्या दुष्कृत्याची आणखी माहिती मिळवितांना रावण राजाचे पूर्व चरित्रहि त्यांस समजून आलें. त्यावरून आपण व हा रावण गुरूगृहीं अध्यापनास एकत्र होतों असें त्यांच्या ध्यानी आलें. मेधाव्रताचं आयुष्य एकांतात अध्यायन, अध्यापनांत गेलें होतें. विद्येच्या आराधनेंत भोंवताली काय चाललें आहे याकडें त्यांचें लक्ष नव्हतें. तरी पण कृषीवलांनीं आपली करूण कहाणी सांगताच त्यांचें कोमल हृदय कळवळले आणि मग त्यांना दुर्बलांचें दु:ख हरण करण्याचा ध्यास लागला. यांनीं शेवटीं ठरविलें कीं, रावणाकडे जाऊन त्याची समजूत घालून गरीबांवरचा जुलूम थांबवावा.

लंकेला जाण्याची तयारी करीत असतां त्यांचे पत्नीनी म्हटलें,

" मी असें ऐकलें आहें कीं, रावणराजा महाक्रोधी आहे. तो कोणाचा उपदेश ऐकून घेत नाहीं. तेव्हा माझे आपणास

सांगणें आहे कीं आपण उपदेश करण्याचे भरीस पडूं नका. पहिल्या खेपेला नुसता जुना स्नेह जागृत करा."

"अग उपदेश करायला मी भितो काय ? तो काय करील माझें, मारील एवढेंच ना. आम्ही देहाला कधींच तृणवत् मानलें आहे"

"मी कुठें म्हणते आपण भितां म्हणून आपण रावणाच्या येथें दुर्बलांचें दुःखहरण करावयाला जाता कां आपली निर्भयता प्रगट करावयाला जाता."

मुनीनी विचार केला, आम्ही उगाच स्वतःला मुनी म्हणवून घेतो. कार्य कोणच्या प्रकारानें सिद्ध होईल याचा विचार– मनन आम्ही केल्याशिवाय आम्ही मुनी कसचे ? "पुढें रावणाची गाठ घेण्याकरिता ते एकदाचे बाहेर पडले. जाता जातां पंपा सरोवरावर विश्राति करितां ते थांबले, स्नान करून संध्या वंदनास ते बसणार इतक्यात आकाशांतून एक विमान मंडलावर मंडले घेत त्या सरोवराकाठीं उतरलें. आंतून एक भव्य आकाराचा, दिसायला उग्र व अंगावर अलंकार घालून, महान् वस्त्रें परिधान केलेला तेजस्वी पुरुष आपल्या परिवारासह बाहेर पडला. या पुरुषासमवेत कांहीं स्त्रियांही होत्या. मेधाव्रत संध्यावंदन जेथें करीत होते तेथपासून दूर अंतरावर ही मंडळी उतरली होती. त्यांनीं आपली वस्त्रें काठांवर काढून ठेवली नंतर सर्वांनीं जलविहार केला. त्यानंतर त्यांनीं बरोबर आणलेले भक्ष्य पदार्थ सेवन केलें व इकडे

तिकडे हिंडत असतां त्या भव्य पुरुषाची दृष्टीं मेधाव्रताकडें गेली, आपला एक परिचारक मुनीकडें पाठवून त्यानें त्याचे-कडून मेधाव्रताची माहिती आणवली तेव्हां त्याला समजलें कीं, हा मुनी आपलाच सहाध्यायी असून आपल्याच भेटीला चालला आहे.

आपल्या गुरू बंधुची भेट अनेक वर्षांनीं होण्याचा योग आलेला पाहून रावणास आनंद झाला व तो लगेच मुनीकडे जाऊन सलगीच्या भाषेत त्याला हांक मारून म्हणाला

काय मुनीराज आम्हाला ओळखले नाहीं वाटतं काय गड्या तुझी लहानपणची विलक्षण स्मरणशक्ति पाहून तर तुला गुरुजींनीं मेधाव्रत नाव दिलें आणि तूं आम्हांला इत-क्यांत विसरलास.

माझं स्मरण कांहीं कार्य झालेलं नाहीं पण आपल्या-तच केवढा फरक झाला आहे तेव्हां ओळखावयासं कसं.

" हा खरं आहे. लहानपणी मी इतका लठ्ठ नव्हतों नाहीं कां ? पण काय करावयाच माझी पुढें एकाने खोडी काढली आणि मला माझ्या दुर्बलतेची आली चीड आणि मग मी खूप श्रम करून आपला देह वज्रासारखा केला. बरं गड्या आमच्याकडे तूं येणार ना ? चल तर मजबरोबर विमानांत बसून नाहींतर तुला माझे लंकेत येणें दुष्कर होईल. अरे ती लंका शंभर योजने आंत अशी एका महासागरांत

आहे. तेथें देव गंधर्व यक्ष यांचासुद्धा माझे परवानगीवाचून प्रवेश नाहीं.

रावणाने आपल्या मित्राला बरोबर घेऊन तो लंका-नगरींत आला तेथें त्यानें आल्यावर मेधाव्रतास अतिथीगृहांत उतरविलें व म्हटलें, " मित्रा मी दोन दिवस कांहीं महत्वाच्या कामांत गुंतलों आहे. तेथपर्यंत तूं या रमणीय आतिथीगृहांत स्वस्थपणें रहा. तुझी सर्व व्यवस्था माझे सेवक उत्तम प्रकारें ठेवतील. दोन दिवसांनीं मीच तुला बोलावणें पाठवीन.

अतिथीगृहांत प्रवेश केल्यावर तेथील प्रमुख सेवकानें त्यास पाद्योदक दिलें व एका भव्य दिवाणखान्यांत नेऊन बसविलें व म्हटलें फलाहाराची व्यवस्था होत आहे तोपर्यंत आपण येथील सुखासनावर विश्रांति घ्यावी.

सेवक गेल्यावर मुनी आपल्याच विचारांत गढून गेला तो मनांत म्हणाला " रावण क्रूर, दुष्ट म्हणून प्रसिद्ध आहे पण आपल्याशीं तर तो किती प्रेमानें वागला. एवढ्या मोठ्या पदावर तो असून अपार वैभव भोगीत असतां जुने नातें तो विसरला नाहीं व अत्यंत प्रेमानें माझें स्वागत करतो आहे. तेव्हां माझ्या उपदेशाचा परिणाम त्यावर खास होईल. इत-क्यांत त्यांना आपल्या पत्नीच्या इशाऱ्याची आठवण होऊन उपदेश करण्याच्या भानगडींत आपण पडावयाचे नाहीं अशी मनाशीं खूण गांठ बांधली.

फलाहार आटोपल्यावर एक सुंदर पोषाख केलेला सुंदर पुरुष मेधाव्रताकडे आला व नम्रपणानें हात जोडून म्हणाला " मुनीराज पलीकडें राजाधिराज रावण महाराजांची अतिसुंदर अशी चित्रशाळा आहे ती अवलोकन करण्यास आपण येतां काय ? "

" चला, काय हरकत आहे " असं म्हणून मुनीराज चित्र शाळेंत त्या राजपुरुषांबरोबर गेले.

## चित्रशाळा.

तेथें भिंतीवर अनेक चित्रें चित्रित केली होती. व दिवाणखान्यांत देशोदेशींच्या दुर्मिळ व अमूल्य चिजा व्यवस्थेशीर मांडून ठेवल्या होत्या.

प्रियवाक राजपुरुषानें प्रथम एका नकाशाकडें बोट दाखवून म्हटलें. मुनीराज नवखंड पृथ्वीचें हे चित्र आहे. महाराजाचें लहानपणाचें वास्तव्य ज्या वटग्रामी प्रथम होतें तें हें गांव. वट बीज मोठें होत होत विस्तीर्ण प्रदेश व्यापते त्या प्रमाणें महाराजांनी आपल्या राज्याचा केवढा विस्तार केला आहे तो पहा " असें म्हणून रावणी राज्याचा नकाशा त्यांना दाखविला नंतर पुढें जाऊन कोण कोणत्या देशीचे लहान थोर राजे महाराजांचे येथें सेवक म्हणून वसत आहेत. तीं नांवे भिंतीवर लिहिलेलीं मेधाव्रतमुनींना दाखविण्यांत आली. त्यानंतर स्वपराक्रमानें कोणकोणत्या देशाच्या महाराण्या रावण महाराजांनीं आपल्या दासीं करून ठेवल्या आहेत.

त्याची नोंद व राण्यांची नांवें मेघावत्रांस तेथें पहावयास मिळाली. त्यांवेळीं मेघाव्रताचें चेहेऱ्यावर दुःख संताप यांची छाया पसरली होती पण आतां संयम करून ते चार पावले पुढें जातात तोंच त्यांना रावण राजाची अवज्ञा केल्यामुळें कोण कोणाला काय भयंकर शिक्षा होतात तें त्यांना चित्रित केलेले दिसलें शिक्षा भोगतांना त्या दुर्दैवी प्राण्यांना जे हाल भोगावें लागत त्यांचें यथातथ्य चित्र तेथें रेखाटलें असल्यामुळें चित्रकलेच्या दृष्टीनें ते उत्कृष्ट ठरलें असतें तरी मेघाव्रतासारख्या कोमल हृदयाच्या पुरुषास ती यमपुरी पहावेना. त्यानें डोळे झांकले व तो पुढें गेला. तो त्यांना देवांच्या बंदी शाळेचे चित्र दिसले. त्यानंतर देवाना कोण कोणत्या कामास जुंपले होतें. त्याचा देखावा पुढें दाखविला होता. थोराची दुर्दशा पाहूं नये असे म्हणतात म्हणून त्यानीं तीं चित्राशाला न पाहता ते पुढें सरकले. तो तेथें रावणाच्या पूर्वयुगाची चित्रे रेखाटली होती बालपणीं रावणानें गुरुगृही कसा अभ्यास केला, तो आपल्या मित्रामध्यें हळुं हळुं अग्रेसर कसा ठरत गेला याचे देखावे पहातांना त्यांना त्यांत खऱ्या, खोट्या गोष्टींची चतुराईने मिसळ करून रावणाच्या प्रगतीची कमान चढती ठेवण्यांत आलेली पाहून मेघाव्रतानें आश्चर्ययुक्त मृदु स्मित केलें.

कोणीही नवीन राज–अतिथि आला कीं, या गृहांत दोन दिवस ठेवून त्याला आपल्या वैभवाच्या, कर्तबगारीच्या

देखाव्यानें भारून टाकल्याशिवाय रावण त्याची भेटच घेत नसे. आसुरी संपत्तीच्या लोकांच्या येथील अतिथी सत्कारांत प्रेम, आदर यापेक्षां अतिथीस वैभवानें दिपवून, अन्नानें भारून टाकून आपले अंकित करणें हाच प्रधान हेतु असतो. पण मेधाव्रतासारख्या निस्पृह मुनीवर रावणाच्या आसुरी–आतित्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. तमोगुणावर रजोगुण मात करील पण सत्वाला थोडेंच अंकित करतां येतें. !

अतिथि गृहांत तीन दिवस काढल्यावर एक दिवस राजाधिराजांचा निरोप आला कीं, क्रीडापर्वतावर सायंकाळीं दोन घटका सूर्य असतां महाराज मेधाव्रताची गांठ घेतील ''

ठरलेल्या वेळीं राजदूत मेधाव्रत मुनींना क्रीडापर्वतावर घेऊन जाण्याकरितां आला. वाटेंत त्यानें रावण महाराजांशीं आदबीनें कसें वागावें याच्या सूचना बोलण्यांत सूचित केल्या. क्रीडापर्वताच्या पायथ्याशीं अतिथीला सोडून राजदूत म्हणाला '' मुनिराज आपण या मार्गानें गेला म्हणजे एका लताकुंजांत जाल तेथें महाराज आपली वाट पहात बसले आहेत. मला येथूनच परतलें पाहिजे कारण आज त्या बाजूला कोणाही राज दूताला येण्याची सक्त मनाई करण्यांत आली आहे ''

मेधाव्रत वर गेला तो रावण सोपान मार्गावर मित्राला भेटण्याकरितां आतुर होऊन पुढे आला होता. मेधाव्रत जवळ येतांच रावणानें, ' यावं मुनीराज ' म्हणून दोन्ही हात पसरून त्याला अलिंगन दिलें. रावणाच्या त्या प्रेमालिंगनानेही मुनींचा

जीव गुदमरून गेला. नंतर मित्राचा हात स्नेहभावानें धरून रावणानें त्यास लताकुजांत नेऊन सुखासनावर अगदीं आपल्याजवळ बसविलें. जुना मित्र भेटला म्हणून आनंद प्रदर्शित करून मित्राच्या मुलाबाळांची व धर्मपत्नीची त्यानें चौकशी केली. मुनीनेहि आपण काय करतो वगैरे सांगून कोणती नवीन ग्रंथरचना केली हेहि राज-मित्रास निवेदन केलें. बोलण्याच्या ओघांत आपल्या मित्राची सांपत्तिक परि-स्थिति कळून आल्यावर खेद प्रदर्शित करून रावण म्हणाला, " मित्रा येथें तुला कांहीं कमी नाहीं. गुरुकृपेनें पराधीन अथवा कठीण अशी एकही गोष्ट मला माहीत नाहीं. तुला लागेल तितकी संपत्ति मी देतो. तूं माझा बालमित्र, तूं दारि-द्र्यांत राहूं नकोस. तूं दारिद्र्यांत असणें म्हणजे माझ्या राजाधिराज त्रैलोक्याधिपती या पदवीस कलंक लागेल. तुला धन देऊं का भूमिदान करूं ? पृथ्वीवरची कोणतीहि वस्तु माग स्वर्गाचें वैभवहि तुला मिळणें कठीण नाहीं. देव माझे घरीं कसे राबत आहेत हें तूं पाहिलें आहेसच.

मेधाव्रत मुनी मध्येंच म्हणाले " पौलस्त्या, तूं एवढ्या मोठ्या पदावर असून मज गरिबाला विसरला नाहींस याचें आश्चर्य वाटते. ' तुझ्या प्रेमाबद्दल मी तुझा अत्यंत आभारी आहे. मला कोणत्याही गोष्टीची गरज लागली तर मी तुला अवश्य कळवीन. गुरुकृपेनें तुला जें वैभव प्राप्त झालें आहे. तशा तऱ्हेच्या वैभवाचा उपभोग जरी मी घेत नसलों, तरी

अध्ययन, अध्यापनांत, माझा काळ जात असल्यामुळें व **संतोष वृत्ति हेंच ब्राम्हणाचें धन आणि विद्या हेच वैभव** याची जाणीव असलेली पत्नी मला मिळाल्यामुळें माझा संसार सुखासमाधानाचा होत आहे. भिक्षेवर माझा चरितार्थ चालतो. यामुळें मला कशाचीहि उणीव भासत नाहीं. माझा बालमित्र वैभवाला चढलेला पाहून त्याला प्रेमानें भेटावें म्हणून मी आलों."

रावणाला ब्राह्मणाचें हें भाषण ऐकून आश्चर्य वाटलें. **समाधानाचें सौख्य या दरिद्री ब्राह्मणाला, आणि त्रैलोक्याचें अधिपत्य मिळवूनहि मी त्याला पारखा "** असा विचार मनांत येऊन आपल्या दरिद्री मित्राच्या वैभवाचा त्याला क्षणभर हेवा वाटला. परंतु सारा जन्म राजकारण करण्यात गेल्यानें व आपलें श्रेष्ठत्व सदा प्रस्थापित करण्याचा त्याचा देहस्वभाव बनला असल्यामुळें, क्षणभर सात्विक बनलेली त्याची वृत्ति फारवेळ टिकली नाहीं. विषय पालटून आपल्याच पराक्रमाचा इतिहास तो मेधाव्रतास सांगूं लागला. आत्मचरित्र निवेदनाच्या भरांत तो म्हणाला, " मित्रा काय सांगूं ! सध्या रावण आला ' येवढें शब्द ऐकले कीं, मनुष्येंच केवळ नव्हें— तर, अमानुष शक्तिचे देव देखील आपली संपत्ति घरें दारें, फार काय सांगूं आपल्या स्त्रिया सोडून पळून जाऊं लागतात. कां बसवला आहे कीं नाहीं त्रिभुवनाला धाक ? " असें बोलतांना छाती काढून त्यानें आपल्या मिशांना पीळ भरला व

आतांपर्यंतच्या सौम्य नेत्रांत तीव्रपणा आणला. गर्वाचा अविर्भाव अंगांत होताच रावणाची छाती एकदम १८ तसू फुगलेली व त्याचबरोबर त्याच्या डोक्यांत उत्पन्न झालेला क्रूरपण पाहून दुसरा एखादा मनुष्य भेदरूनच गेला असतां पण शमप्रधान वृत्तिचा तो मुनी रावणाला मृदु आवाजांत विचारता झाला.

" मित्रा, तूं पराक्रमी शूर चाणाक्ष तर खराच परंतु तुझ्या समोर उभे राहून थोडा वेळही कोणी तुझा प्रतिकार करूं शकत नाहीं. एवढी पृथ्वी निर्वीर्य कशानें बरें झाली असावी ? "

ब्राह्मणाच्या ह्या सरळ प्रश्नानें रावणाची वृत्ती सौम्य होऊन तो मित्रास परिस्थितीचें ज्ञान करून देण्याचें उद्देशानें म्हणाला

" मेधाव्रत मुने तूं माझा बाळ मित्र, त्यांतही ऐहिक वैभवाविषयीं निरीच्छ तेव्हां तुजजवळ खरें खरें सांगण्यास हरकत नाहीं. देवांनीं मला वर कसा दिला व तो मिळविण्याला मला श्रम, कसें पडलें हें तूं चित्र फलकांत पाहिले आहेसच. मला वर प्राप्ती झाल्यावर मी वैभव मिळविण्याच्या उद्योगास लागलों. वर म्हणजे एक दिव्य विद्या आहे; जादू नव्हे. त्या शक्तिचा कौशल्यानें नेटानें व अविरत श्रम करून उपयोग करावा तेव्हां इतर फल प्राप्ती होत असते. पहिल्या पहिल्यानदा राज्यें मिळवितांना मला फार श्रम पडलें.

पराक्रमी शूर पुरुषांशीं गांठ पडली म्हणजे एकदम यश मिळत नसे. अशा वेळीं माझा आततायी दृढ निश्चयी स्वभाव उपयोगी पडला. एका मागून एक असे कांहीं जय मिळविल्या-बरोबर माझ्या पराक्रमाचा, तापट स्वभावाचा गवगवा होऊन कोणी प्रतिकार करण्यास धजत नसे. त्यांतूनही जर कोणी मजवर दंड ठोकले तर माझे शक्ति सर्वस्व वेंचून त्याचा पराभवच नव्हे तर त्याच्या सर्वस्वाचा नायनाट करून इतरांना मी विलक्षण जरब बसवित असें यामुळें पुढें पुढें आमची स्वारी ज्या ज्या प्रदेशांत जाई तेथले राज्य हुंकारानें, काय सांगू मित्रा नुसत्या हुंकारानें राज्य हस्तगत होई. ज्याला त्याला आपल्या जीवाची काळजी त्यामुळें पृथ्वीचें राज्य हां हां म्हणतां माझे हस्तगत झाले " असें म्हणून रावणानें एक दीर्घ निश्वास टाकला त्यानें तेथल्या लताची पाने थरथर कांपूं लागली. रावणानें आज आपलें मन हलकें करण्याचा जणूं संकल्पच केला होता. तोपुढें थोड्या खिन्न स्वरानें म्हणाला

" मित्रा काय सांगू ! वैभवतृष्णा ही मद्य तृष्णेपेक्षाही तीव्र होते. जों जों मोठें वैभव प्राप्त करून घ्यावें तों तों त्याची हांव अधिकच सुटते आणि मग जन्मभर त्यांतून मनुष्याची सुटकाच होत नाहीं. तूं बरा बाबा यांतून सुटलास ! ग्रंथ लेखनाची हांव अशीच असते कारे ? पण तें असो मी तुला काय सांगत होतों बरं—हं—मी पृथ्वीचें राज्य आक्रमण केल्यावर माझी दृष्टी स्वर्गाकडे वळविली. पृथ्वीपेक्षां स्वर्गाचें

राज्य मिळविणें कठीण असलें तरी अशक्य खास नाहीं असे विचार माझे डोक्यांत घोळूं लागले. मित्रा आम्ही महत्वाकांक्षी राजे एक तऱ्हेचे कवि असतो असें तुला सांगितलें तर आश्चर्य वाटेल. कवि जसा कल्पनेचे मनोरे रचतो त्या प्रमाणें आम्हीही प्रथम कल्पनेनें राज्यें जिंकतों व वैभवाच्या शिखरावर आरूढ होतो. पण निष्क्रीय कवी सारखे आम्ही तेवढ्यानें समाधान मानीत नाहीं. कल्पनेनें बांधलेले मनोरे प्रत्यक्ष कृतीनें बांधण्यास लागून आम्ही स्वतः ते तावडतोब पुरे करतों. इंद्राचें राज्य मिळविण्याची कल्पना माझे मनांत आली त्यावेळीं मी यशा विषयीं साशंक होतों. कारण मित्रा, देव हे का मानवासारखे सामान्य शक्तिचे होतें! देवाजवळ अनेक अद्‌भूत शक्तीची अस्त्र व आयुधें होती. पण तुला माहित आहे ना कीं, कार्याच्या काठिण्यानें डगमगून जाण्याचा माझा स्वभाव नव्हें. जों जों कार्य कठीण तों तों माझें धैर्य वाढावयाचे शेवटीं एकदा हिय्या करून स्वर्गावर स्वारी करण्याचं मी ठरविलं रावण येणार ही बातमी येतांच देवांची पांचावर धारण बसली. कारण त्यांचें कानीं माझ्या पराक्रमाच्या अद्‌भुत कथा अगोदरच जाऊन पोहोंचल्या होत्या. मन एकदां भीतिग्रस्त झालें कीं, मग विवेक कुठला ? आणि विवेकाजवळ तर अनेक शक्ति रहातात. मी स्वर्गावर स्वारी नेल्याबरोबर देव गलित धैर्य होत्साते पळत सुटले. त्यांच्या हातांतील सर्व शक्ति पायांत

उतरली यामुळें मला त्यांचें युद्ध-कौशल्य पाहण्यास न सांपडत फक्त पदलालित्य दिसले " असें म्हणून रावणानें मोठें हास्य केलें व पुढें आपली कथा चालवून तो म्हणाला– " हें मुने त्यावेळचीं त्याची धांदल पाहण्याजोगी होती सर्व वैभव टाकून प्राण घेऊन ते पळत सुटले आणि स्वर्गाचें राज्य माझें हातीं सहज आलें ! मित्रा त्यावेळीं दुसरा कोणी असता तर त्याचें मस्तक असल्या यशानें फिरून जाऊन तो मूर्खा सारखा वागतां. अशाहीं परिस्थितींत मी माझें मस्तक शाबुत ठेवले म्हणून मला ओळखता आलें कीं, माझी स्वारी अकस्मात आल्यामुळें देवांचें धैर्य गेलें असले तरी तें पुनरपि त्यास प्राप्त झाल्याशिवाय रहाणार नाहीं. आणि मग ते आपल्या आमानुष शक्तिनें पुनरपि स्वर्गाचें राज्य मजपासून हिसकावून घेतील. देवाना इतर मानवा प्रमाणें क्षुद्र समजून मी सोडून दिले नाहीं, तर त्यांना माझ्या सेवकांकडून पकडून आणवून माझें बंदिखान्यांत ठेवलें आहे. **आत्मविश्वासाच्या अभावी देवांनीं स्वर्ग गमावला व आत्मविश्वासाच्या जोरावर मी त्रैलोक्याचें राज्य कमावलें.** मित्रा पृथ्वी नीर्वीर्य झालेली नाहीं फक्त वीर्यवान् लोक प्रतिपक्षाचा प्रतिकार अंगी शक्ति असून करीत नाहींत, यामुळें उर्वीतल निर्वीर्य भासतें एवढेंच. देवांच्या शक्ति आज सुप्तावस्थेंत आहेत त्या त्यांना माझ्या खऱ्या शक्तिचा अंदाज जर बरोबर लागला तर जागृत होऊन एका क्षणांत मला रसातळास पोहचवतील,

म्हणून देवांना मी कधींही जवळ येऊं देत नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांना माझें दर्शन ही होत नाहीं. माझ्या सेवकांचे मदतीनें त्यांना फक्त मी राबवून घेत असतो."

यावर मेधाव्रतमुनी म्हणाले, "राजेश्वरा आपल्या पराक्रमाचें सर्व रहस्य माझें ध्यानांत आलें. आतां एक शंका विचारावयाची आहे."

"विचार मित्रा कांहीही विचार, आज हा रावण सांगण्याच्या लहरीत आला आहे. मी अपेक्षेबाहेर माझे मन मोकळे केलें आहे. फार दिवसांनी मन हलकें झालेंसें वाटलें. मित्रा, आम्हां राजे लोकांना ज्यांच्याजवळ मोकळे मनानें बोलून हृदयींचें गुज सांगू असे स्नेही सोबती नसतात यामुळें आमचे मस्तक सोन्याच्या मुकुटापेक्षां गुप्त विचारांच्या भारानेंच जड होतें. असो. चल, आपली शंका मन मोकळेपणानें विचार. असें म्हणून रावणानें मनाचा मोकळेपणा प्रदर्शित करण्याकरितां आपलीं गात्रे तेथील सुखासनावर पसरून शिथील केली.

मेधाव्रत उत्तेजित होऊन म्हणाले, "रावणा तूं माझा बालमित्र, तेव्हां तुझ्या पारलौकिक कल्याणाची मला काळजी वाटते. पराक्रम करून राज्य साधन करीत असतां तुझ्या हातून म्हणे पुष्कळ दुष्कृत्यें घडलीं आहेत. परस्त्री हरणाच्या दोषाचा तूं धनी झाला असून सज्जनांच्या वित्ता-बरोबर प्राणांचेही तुझ्या हातून हरण झालें आहे असें मी

ऐकतों. तें खरें का ? जर तसें असेल तर याबद्दल मृत्युनंतर ईश्वराला जाब कोणता देशील. ?"

रावणानें असल्या अपमानकारक प्रश्नाची कधींच अपेक्षा केली नव्हती. म्हणून तो प्रथम दचकला. तूं पापी आहेस असें आजवर त्याला म्हणण्याची कोणाची छाती नव्हती. मेधाव्रताचे तोंडचे ते शब्द– एका बालमित्राच्या– निरिच्छ ब्राम्हणाच्या तोंडचे हे शब्द, म्हणूनच रावणाने ते सहन केले. दुसरा जर कोणी त्याचे जागीं असता तर रावणानें त्याची कातडीच सोलून काढून त्यास ठार केलें असतें. पण मेधा-व्रत पडला लंगोटी मित्र. म्हणून त्याची उपेक्षा करून रावण गंभिरपणे म्हणाला,

" मित्रा, वैभवाचे नादी लागलेल्या पुरुषांना पापपुण्याचा एवढा बारीक विचार करण्याला फुरसत असते कोठें ? खरें पुसशील तर मृत्यु व परलोक यांचा विचारच मला कधी शिवला नाहीं व तेही बरेंच झालें. कारण अतिविचारानें पराक्रम नष्ट होतो. तूं म्हणतोस तसल्या गोष्टी माझे हातून घडल्या नसतील असें नाहीं. कारण राज्यविस्ताराबरोबर अशा गोष्टी अपरिहार्यच असतात. आतां परस्त्रीहरणांत विषयलालसे-पेक्षां शत्रूच्या मानभंगाची कल्पनाच मुख्य असते. अशा स्त्रीया माझ्या दासी झाल्यावर माझें वैभव व पराक्रम पाहून मला आपण होऊन वश होतात. तेव्हां मी पातकी कसा ? शिवाय असल्या गोष्टींत मोठेंसें पातक आहे असें मी समजत नाहीं. पण

यदाकदाचित् तें तसें असलें व त्याबद्दल तुझ्या परमेश्वरासमोर मला जाब द्यावा लागला, तर मी त्या ईश्वरबुवाला स्वच्छ सांगेन–

" तुझ्या कायद्याप्रमाणें मी जर गुन्हेगार असलो, तर हा गुन्हा करण्यास मला ज्यांनीं प्रवृत्त केलें त्यांना प्रथम शिक्षा कर हे बावळट व शेळपट लोक अन्यायाचा कधीच प्रतिकार करीत नाहींत, यामुळेंच ह्या अप्रतिकारी लोकांना छळण्याची व लुबाडण्याची इच्छा आम्हां वीर्यवंतांना होते. बारीक सारीक गुन्हे पचत गेले कीं, लुटारू, दरवडेखोर मनुष्याचा तो स्वभावच बनून जातो व मग कोणतीही गोष्ट करण्याला मन कचरत नाहीं. मी परस्त्रिया हरण केल्या असतील –नव्हे आहेतच, व त्यांत मला कोणताहि कमीपणा वाटत नाहीं " असे रावण निर्लज्जपणाच्या धीटाईनें बोलून गेला व पुढील सत्य त्याचे तोंडून सहजगत्या बाहेर पडलें " पण मला दोष देऊन पापी म्हणणारे लोक ही गोष्ट लक्षांत घेत नाहींत कीं, हरण केलेल्या स्त्रियांच्या पतींनीं जर माझा वेळींच प्रतिकार केला असतां, स्वस्त्री म्हणजे अब्रु –या अब्रूचें रक्षण प्राणांचे मोल देऊनही करावयाचे असते ही गोष्ट जर त्या पतींनीं ध्यानांत ठेवून माझा प्रतिकार केला असता, तर मी कितीहि बलाढ्य व पराक्रमी असलों तरी एवढ्या स्त्रियांचे हरण माझे हातून झाले नसते.

मित्रा, झाले असते कां असे ? स्त्रियांचे हरण तर राहूं दे पण हें माझे वैभव सुद्धां एवढे वाढले नसते. म्हणून तुला बजावतो कीं, जगांत जर कोणी महापापी लोक असतील तर ते अन्यायाचा प्रतिकार टाळणारे लोक होत. रावणाच्या नांवाचा उगाच बभ्रा ! " रावण आवेशानें म्हणाला,

" परिस्थिती ही अप्रतिकारी लोक उत्पन्न करितात मी फक्त तिचा फायदा घेतों. देवाच्या घरीं न्याय आहे असें तूं समजतोस ना ? तेव्हां मित्रा, परलोकांत देखील मला दुःख नाहीं याची तूं खात्री बाळग. "

अशा तऱ्हेचा होत असलेला अप्रिय संवाद संपविण्याच्या उद्देशानें तो पुढें म्हणाला,

" तुला कांहीं पाहिजे असेल तर खुशाल मागून घे. संकोच करण्याचे मजजवळ तरी तुला कांहीं कारण नाहीं.

मेधाव्रतानें हे त्याचे भाषण शांतपणानें ऐकून घेतले व शेवटी तो म्हणाला

" मला सत्वर घरीं गेले पाहिजे. हवनादी नित्य कर्मे खोळंबून कशी ठेवता येतील ? "

हे शब्द ऐकून रावण मोठ्यानें खो खो हसला तें त्याचे हसणें मेधाव्रताला ठाणबंदी घोड्याच्या खिंकाळण्याप्रमाणें भासलें. मेधाव्रताचे पाठीवर आपल्या मांसल हाताची भली जंगी थाप मारून तो म्हणाला " ज्या देवांना संतुष्ट करण्या-करितां तूं एवढा लगबगीनें जात आहेस ते जर माझ्या बंदीत !

—बरे जा मी तुला अडवीत नाहीं. तुझ्या श्रद्धेप्रमाणें तूं वाग.

मेधाव्रतानें रावणाचा निरोप घेतला व तो घरच्या मार्गास लागला. आपल्या उपदेशानें रावणाचे मन आपण वळवूं असें जें प्रथम त्याला वाटत होते ती वेडी आशा होती. असें तो आपणाशी म्हणाला. असुरी वृत्तिविषयीं त्यानें पुष्कळ वाचले ऐकले होते. पण तिचें खरे स्वरूप कसें असते हें त्याला आज प्रत्यक्ष ऐकावयाला मिळालें. रावणाला उपदेश करून ताळ्यावर आणण्याविषयीं तो निराश झाला. असलातरी चिखलांतूनच कमलपुष्पांचा लाभ होतो; अगर डामरांतूनच मधुरतर अशी शर्करा निघते त्याप्रमाणें आज रावणाच्या भाषणांतच लोककल्याण करणाची किल्लीहि त्याचे सहज हातीं लागली.

अन्यायाचा प्रतिकार करण्याची जनताबुद्धि नष्ट झाली व तिचा आत्मविश्वास डळमळला म्हणूनच रावण मातला ही गोष्ट लोकांना सांगत फिरण्याचे त्यानें ठरविले. घरीं आल्यावर त्याने आपलें ग्रंथलेखन आटोपते घेऊन पोथ्या गुंडाळून ठेऊन अन्यायाचा प्रतिकार करण्याचा उपदेश करीत फिरण्याचे त्यानें जेव्हां ठरविले तेव्हा त्याचे मित्र व त्याची पत्नी त्यास म्हणाली, ‘ तुमच्या हातून अलौकिक ग्रंथनिष्पत्ती व्हावयाची ती टाकून तुम्ही प्रचारकाचे काय काम करतां ? हें काम दुसरा कोणीहि करील. ’ यावर मेधाव्रताने शांतपणें उत्तर दिले.

" रावणाच्या गुलामगिरींत जनता जोंपर्यंत खिचपत पडली आहे तोंपर्यंत चिरकाल टिकणारे शास्त्रीय चालू ग्रंथ परिस्थितीकडे डोळेझाक करून लिहीत बसणें हे मला शक्य नाहीं. आपलं दंडकारण्य रावणाच्या गुलामगिरींतून एकदा मुक्त होऊं द्या कीं मोठमोठे ग्रंथ लिहिण्याला प्रतिभावान् पुरुष पुढें येतील. आसुरी संपत्तीचा नागडा नाच प्रत्यक्ष पाहून माझ्या पोटांत जी आग उठली आहे ती सामान्य प्रचारकांत कशी उत्पन्न होणार ? व त्याचा लोकांवर प्रभाव तरी कितपत पडणार ?." असें म्हणून तो घराबाहेर पडला आणि तहान भूक कांहीं एक न पहातां सारखा अन्यायाचा प्रतिकार करण्याचा उपदेश करीत फिरत राहिला. अन्याय सोसणें हा लोकांचा हल्ली स्वभावच होऊन बसला होता. त्यामुळें मेघाव्रताचे श्रम तात्काळ फलद्रूप झालें नाहींत. पण प्रतिकार बुद्धी हळूं हळूं लोकांत जागृत होत होती.

कांहीं काळ गेल्यावर श्रीरामचंद्राच्या प्रिय पत्नीचें हरण जेव्हां रावणानें केले तेव्हां ही प्रतिकार शक्ती पूर्ण नेटानें रामचंद्रास साहाय्य देण्यास प्रगट झाली. रामानें प्राकृत जनासारखा हा अन्याय निमुटपणानें गिळला नाहीं. अन्यायाचा प्रतिकार करण्याची बुद्धी ज्या असंख्य वानर जातीत मेघाव्रतानी उत्पन्न केली होती. त्या जातीनें रामचंद्रास लंकेवर स्वारी करण्यास सहाय्य केलें.

अठरा पद्म वानर सैन्य रामचंद्राचे अधिपत्याखालीं लंकेबाहेर येऊन उतरलें आहे ही गोष्ट रावणानें ज्यावेळीं मंदोदरीचे महालांत प्रथम ऐकली त्यावेळीं त्यास ती गोष्ट खरीच वाटेना क्षुद्र मानव त्यांतून पादचारी वनवासी राम आपल्यावर चालून येतो आहे. असे जेव्हा त्याचे अमात्यांनीं पुन्हां पुन्हां त्यास सांगितलें तेव्हां वानर सैन्य पाहाण्याकरितां तो लंकेच्या तटावर आला तोंच सुग्रीवानें एकाएकी त्याजवर झडप घालून त्याचा मुगुट खालीं पाडला. रावणानें त्याचे हातून स्वतःची कशीबशी सुटका करून घेतली व तो मंदोदरीचे मंदिरात पुनश्च आला व हताश होऊन म्हणाला,

" मंदोदरी, रावणाची आज सद्दी संपली. माझे वैभव आतां हां हां म्हणता नष्ट होणार !

मंदोदरी पतीचे शांतवन करण्यासाठी म्हणाली,

" रामचंद्राचे बळ मोठे पाहून आपल्याला जयाची आशा नसली तर त्यास आपण सीता परत देऊन टाका आणि समेट करा. "

रावण आज निराश झाला होता. आपली सद्दी संपली असें आपण कां म्हणतो ह्याचें रहस्य मंदबुद्धी मंदोदरीच्या लक्षांत आलें नाहीं असें वाटून त्यानें तिची कींव केली.

" वेडे, मी रामाला भितो असें का तुला वाटतं ? त्या पादचारी, वनवासी रामाला मी माझ्या मुठींनं आवळून मारूं शकेन, पण मी जो भितो तो क्षुद्र रामाला नसून

वनचरांत उत्पन्न झालेल्या प्रतिकार शक्तीला भीत आहे. रामाचा जरी आज मी पराभव केला तरी माझी खरी शक्ति काय आहे याचा अंदाज या लोकांना लागून रामाचे व वानरांचे भाईबंद माझा प्रतिकार करावयाला चोहोबाजूंनीं धावतील त्यावेळी मी त्यांना कितिसा पुरणार ? म्हणून म्हणतो कीं, रावणाची सद्दी संपली ! रावणी राज्याचा पाया ढासळला ! आतां रावण जुलमी असला तरी भ्याड नव्हें एवढेंच भावी इतिहासकारांना दाखविण्याकरितां मी घनघोर युद्ध करणार आहे.

## सौदामिनीस प्रश्न

सुन्दर तूं चपला तूं, तूंच गमे मूर्ति एक तेजाची ।<br>
सौदामिनी रुची गे कैशी जड कुरुप मलिन मेघाची ॥

जड माझा मेघ जरी, सुकल्या जीवासि देइ चैतन्य ।<br>
कुरुप जरी भासतसे, निर्मी सौंदर्य मूर्ति जगमान्य ॥

मलिन–वसन मेघ पहा, नाशी मालिन्य सर्व जगताचें ।<br>
ऐसा वदान्य वर हा, मान्य मला परि तुम्हां कसा न सचे ॥

# भक्तांचें शुद्धीकरण

एक दिवस भक्तमंडळींत अशी सूचना आली कीं, या समाजोन्नतीच्या काळांत आपण मागें राहून भागणार नाहीं पुढें येण्याकरतां एक परिषद् आपण भरविली पाहिजे ही सूचना ऐकून दुसरा म्हणाला बापहो ! निराळी परिषद् कसली भर-वितां. पंढरीस आषाढी कार्तिकीस जो मेळा भरतो तीच आपली परिषद्. तेथें स्वागत मंडळ नको. भक्तांचे स्वागत करण्याकरितां पांडुरंग सदैव उभा आहे. मंडप उभारण्याची गरज नाहीं गाथ्यांतून कायम ठशाचे ठराव कृपाळू संतानी अगोदरच लिहून ठेवले आहेत. यावर तिसरा एक गृहस्थ म्हणाला आपण म्हणता ते सर्व खरें ! परंतु पंढरीस जो मेळा भरतो त्यांत भक्त व अभक्त यांची एकच खिचडी होत असल्यामुळें खऱ्या भक्तांना मोठी अडचण उत्पन्न होते. या करता खऱ्या भक्तांची एक निराळीच परिषद् बोलवावी.

ही सूचना सर्वांना पसंत पडून त्या प्रमाणें ठराव करण्यांत आला. अध्यक्षस्थानीं एका प्रसिद्ध देव भक्ताची योजना करण्याचें ठरलें. परिषदेची जाहिरांत सर्व वर्तमान पत्रांतून दिली गेली प्रतिनिधी करतां फी नव्हती कारण खऱ्या भक्तावर लक्ष्मीची कृपा नसतेंच ! भोजन व्यवस्थेबद्दल लिहि-ण्याचें कारणच नाहीं. भिक्षेची कामधेनू प्रत्येक भक्ता बरोबर अस-तेंच थंडी वाऱ्याची माहिती देऊन जास्त पांघरूणें आणण्याबद्दल

इषारा देण्याचें प्रयोजन नव्हतेच भक्त म्हणजे स्थितप्रज्ञ! शीतोष्ण सहन करणारे! यामुळें स्वागतमंडळाच्या मागच्या बऱ्याचशा कटकटी आपोआपच मिटल्या होत्या.

भक्ताची—खऱ्या भक्ताची व्याख्या देऊन प्रतिनिधींची संख्या नियमित करण्याचें राहिलेलें काम लौकरच उरकण्यांत आलें. भक्ताची व्याख्या गद्यापेक्षां पद्यांत करणेंच स्वागतमंडळाला इष्ट वाटलें कारण देव व भक्त यांना गद्यापेक्षां पद्यच लौकर समजतें असें दिसतें. वर्तमान भाषेपेक्षां प्राचीन भाषा देव भक्तांना विशेष प्रिय. शिवाय जीवन्त माणसाच्या वाणीपेक्षां मृताची वाणी जास्त जोरदार ठरत असल्यानें तुकोबाच्या अभंगांतील भक्ताची व्याख्या निवडण्यांत आली. ती व्याख्या अशी:—

भक्त ऐसें जाणा जे देहीं उदास।
गेले आशा पाश विसरोनी ॥१॥

नाशिक जवळच्या तपोवनांत ठरलेल्या वेळीं भक्तगण जमूं लागले. लांबलांब काळ्या पांढऱ्या पिंगट दाढ्या-जटांचे अनेक तापसवृंद आले. वीणा-मृदंगान्वित टाळ-चिपळ्या समवेत अनेक वारकरी तुळशीच्या माळा गळ्यांत घालून गोपीचंदनाचे टिळे लावून आले होते. हुरमुजी रंगाच्या कफन्यांचा तांडाचा तांडा आला. नंग्या साधूंचा मेळाहि प्राप्त झाला. सर्वांना परिषद् मंडपांत प्रवेश मिळून सर्व भक्तगण स्थानापन्न झाल्यावर अध्यक्षांच्या निवडणुकीची सूचना होणार

इतक्यांत डोळ्याला चष्मा लावलेला, गालफडे बसलेला, धोतराचे सोगे सोडलेला, अंगात नुसता एक शर्ट, खाकेंत एक टिपणवही, हातांत रानटी झाडाच्या चार–दोन डहाळ्या व सूक्ष्मदर्शक भिंग, असा एक गृहस्थ परिषदेत प्रवेश मिळविण्याकरितां द्वारांत आला.

द्वारपालानें त्याला अटकाव करून म्हटलें "ही सायन्स कॉंग्रेस नव्हे, भक्तांची सभा आहे. तुम्ही चुकून येथें आलेले दिसता."

यावर तो तरुण गृहस्थ हंसून म्हणाला " ही सायन्स कॉंग्रेस नाहीं हें मला माहीत आहे. भक्ताच्या परिषदेत प्रवेश मिळविण्याकरितांच मी येथें आलों आहे. कोण म्हणतो मी भक्त नाहीं म्हणून ? भक्तांच्या व्याखेप्रमाणें मी भक्त आहे किंवा नाहीं हें पहा व मग मला अटकाव करा."

" भक्त ऐसे जाणा जे देही उदास। अरे मला नॅचरल सायन्सचा नाद लागल्यापासून माझी काय स्थिती झाली आहे ते पहा. नाना तऱ्हेच्या दुष्प्राप्य वनस्पती मिळविण्याकरितां तहान भूक विसरून मी रानोमाळ फिरतो. कांटे पायांत यथास्थित रुततात पण त्याची मला भिती वाटत नाहीं. विंचवाची व विषारी सर्पांची वेटोळी माझ्या घरांत टोपल्या खालीं ठेवलेली आढळतील. दगडाचे नमुने हुडकतांना ह्या सह्यपर्वतांतील दरीन् दरी, उपाशी तापाशी, अनवाणी हिंडून मी आलो आहे. ह्या माझ्या तेजस्वी डोळ्यांच्या खाचा झाल्या आहेत. लहान-

पणीं सुखांत वाढलेल्या गुटगुटीत शरिराचें मांस झडून अस्थि-चर्मवत् देह झाला आहे. एखाद्या वेळीं विचारांत अगर वनस्पतीची परिक्षा करण्यांत गुंतलो कीं टेबलावरचा चहा तसाच निवून जातो. ही झाली माझ्या देहाची स्थिति. मला एक सत्वस्थ, सुशील सुंदर अशी पत्नी आहे पण तिच्याजवळ दोन गोड शब्द बोलण्याची मला क्वचितच आठवण होते. बरेच दिवसांनीं मी घरीं आलो कीं माझी बिंदू व माधव माझ्याकडे येऊन बाबा बाबा म्हणून मला बिलगतात पण मी कोठें त्यांच्याकडे पाहतो? माझी ही विक्षिप्त वृत्ती पाहून माझे स्नेही सोबतीहि एक एक मला सोडून गेले आहेत. आज माझी पुस्तकें मी व हा निसर्ग एवढेच काय ते आम्ही एकमेकांचे सोबती आहोंत."

हें भाषण मोठ्यानें व तीव्र स्वरांत चालले होतें ते आंतील मंडळीस ऐकूं जाऊन सभेंत थोडी गडबड उडाली तेव्हां चिटणीस महाशय धावत बाहेर येऊन म्हणाले येऊं द्या त्या गृहस्थाला आत. सभा सुरू झाल्यावर हा भक्तांच्या कोटीत येतो कीं नाहीं हें अध्यक्षच ठरवतील.

सभागृहांत भक्ताच्या व्याख्येवर भक्त मंडळींत जोरानें चर्चा चालू असतां दुसरीच एक व्यक्ती प्रवेश मिळविण्या-करितां हुज्जत घालीत होती.

या व्यक्तीच्या डोक्यावर झिरमिळ्या उडालेली, जर काळीं पडलेली, रंग उडून गेलेली अशी पगडी

दिसत होती. त्या पगडीचे कापड जीर्ण होऊन त्याचे दोरे निघाले होते व आतील कागदी खोक्याचा पांढरा रंग मधून मधून डोकावत होता. त्या व्यक्तीच्या अंगांत एक सदरा होता तो कोणच्याच रंगाचा दिसत नव्हता म्हणून मूळचा पांढऱ्या कापडाचा असावा असें अनुमान करता आले असते. त्याचे धोतर लांडे असून एकाद्या धंदेवाईक तेल्यानें आपलें म्हणून त्यावर हक्क सांगावा इतके ते तैलबिंदूनीं चित्रीत झालें होते "

" भक्ताची सभा ती हीच कां हो? " असें नाईकांनीं द्वारपालास मोठ्यानें विचारलें. द्वारपालानें होकारार्थी उत्तर देऊन सांगितले कीं " आपल्याला येथें प्रवेश मिळणार नाहीं. ही खऱ्या भक्तांची सभा आहे. मी आपणाला चांगलें ओळखतो " असे म्हणून द्वारपालानें नाईकाकडे पायापासून डोक्यापर्यंत नजर टाकली आणि कुत्सीतपणानें हंसून म्हणाला. " तिमाजी नाईकाचे आपण वडील बंधू ! देवदर्शन आपण चुकूनसुद्धां कधींहि घेत नाहीं किंवा दीनदुबळयांच्या आपण चुकूनसुद्धां उपयोगी पडत नाहीं. "

टीका पुढें चालविण्याला द्वारपालाला अवसर न देता आलेला गृहस्थ त्याच्या अंगावर खेंकसून म्हणाला, देवाच्या बापाचे मी काय खातो ? काय म्हणून मी त्याची पूजा करावी ? प्रवेशद्वारावर तुम्ही काय लिहिलें आहे याची शुद्ध ठेवा—

" भक्त ऐसे जाणा जे देही उदास—" या कसोटीला

मी उतरतो किंवा नाहीं हे पहाल तर खरं ?

अरे मी लक्ष्मीचा उपासक आहे.

एखाद्या मूर्तीची पूजा अर्चा माझे हातून होत नसली तरी माझ्या दैवताला धक्का लागूं नये, कोणी त्याची अवहेलना करूं नये म्हणून मी किती जपतो याची तुम्हा कल्पना नसेल. ही द्रव्योपासना माझ्या घराण्यांत आठ पिढ्यापासून चालत आली आहे ! श्रीरामाची उपासना करून रामदासासारखा अद्वितीय रामभक्त निर्माण होण्याला ठोसरांच्या कुळाला एकवीस पिढ्या वाट पहावी लागली, पण आमच्या कुळांतील पुरुषांची लक्ष्मीच्या उपासनेंत इतकी तन्मयता होती कीं, माझ्यासारखा अलौकिक लक्ष्मीभक्त आठव्या पिढीलाच उत्पन्न झाला. माझ्या वडिलांनीं घरांतील मोहराचे एकवीस हंडे ज्या दिवशीं माझे स्वाधीन केले त्याला आज दोन तपे होऊन गेली. तुम्ही लोक दर एकादशीस ज्याप्रमाणें देव्हाऱ्यातील देव घासून पुसून स्वच्छ करता त्याप्रमाणें दर महिन्यांस मी एक एक हंड्यातील मोहरा काढून त्या घासून लखलखीत करून ठेवण्यांत यत्‌किंचितही आळस करीत नाहीं. या मोहोरांतील एकहि मोहोर आजपर्यंत स्वतःच्या चैनीसाठीं नाहींच नाहीं, पण माझ्या देह रक्षणाकरितांसुद्धां खर्च केली नाहीं. ही लक्ष्मीची उपासना करीत असतां मला देहदंड कांहीं थोडा थोडका घ्यावा लागला नाहीं ?

बाजारांत देवघेव होतांना जे दाणे जमिनीवर सांडतात

ते मी टिपून आणून त्यावर कुटुंबाची उपजीविका चालवितो. यामुळें अनेक "नक्कें" केल्याचें पुण्य मी जोडलें आहे. माझ्या लग्नांत मिळालेली पगडी ती हीच ! द्वाररक्षका, या या माझ्या वृत्तीमुळें लोकांची कुत्सित बोलणीं ऐकण्याचा मज-वर नेहमीं प्रसंग येतो पण मी त्याकडे बहिरेपणा पत्करून दुर्लक्ष करतो, मला मोठेपणा देऊन मजकडून सार्वजनिक कार्यास लोक मदत मागतात पण मी लोकेषणाचा त्याग केला असल्यामुळें वर्गणी देऊन मोठेपणा घेण्याचा मोह मला होत नाहीं. कधी कधी गरिबांची दुःखें सांगून कळवळा उत्पन्न करून समाज सेवक मजपासून द्रव्य काढण्याचा प्रयत्न कर-तात. मी मनुष्य आहे, मला भावना आहेत पण या द्रव्योपासनेकरितां कळवळयाचा आवेग मी तसाच अनेक वेळां गिळला आहे. कधीं धर्माचा अभिमान तर कधीं देशाचा अभिमान जागृत होऊन पैसा देण्याचा मोह अनावर होई पण ते सर्व आवेग मी आजपर्यंत सहन केले आहेत. अहो, शीतोष्णापेक्षां हे भावनांचे आवेग सहन करणे सोपे नाहीं. माझें पितृप्रेम किती जाज्वल्य, वडोलांना स्वर्गांत सौख्य प्राप्त व्हावे असें कोणा पितृभक्त मुलाला वाटणार नाहीं? पण परलोकात त्यांचे जीविन सुखाचे व्हावें म्हणून करावयाची दानेसुद्धां आखडती घेतली. लक्ष्मीची उपासना किती खड-तर आहे याची कल्पना द्वारपाला तुला आली काय ? अरे रामाप्रमाणें तारुण्यकालीं मी आरण्यकव्रत आचरीत आहे.

मऊ शय्येवर निजत नाहीं. मुग्रास अन्न खात नाहीं. सुगंधी द्रव्याचा उपभोग घेत नाहीं. अरे बालकांचा मोह कोणाला नसतो. मोठमोठ्या निग्रही पुरुषांना बालहट्ट, स्त्रीहट्ट हे पुरविल्या-शिवाय भागतच नाहीं. पण मी याही पलीकडे गेलों आहे. पुन्हा सांगतों, शरीराचा मोह मी धरला नाहीं, इंद्रियें तपस्व्या-प्रमाणें आवरून धरलीं आहेत, मोहक पाश सर्व तोडलें आहेत सर्व कशाकरितां ? लक्ष्मीच्या उपासनेकरितां. लक्ष्मीच्या भक्तीकरितां ! असें असून तूं मला भक्तांच्या मेळ्यांत घेत नाहींस ?

हें भाषण ऐकून द्वारपाल चकित झाला. भक्त निव-डण्याचें काम आपणाला वाटलें होतें इतकें सोपें नाहीं असें आपल्याशीं पुटपुटत वरील नामधारी भक्ताला सभेंत सोडत आहे. इतक्यांत एक तऱ्हेवाईक लोकांचा तांडा आला. त्यांचे डोळे आरक्त दिसत होते, वस्त्रापात्रांची त्यास शुद्ध नव्हती, चेहऱ्यावर तिरसटपणाची झांक होती. या लोकांना सभेंत मज्जाव झाल्याबरोबर ते रागानें उसळले व त्यांतील एक मनुष्य म्हणाला.

काय आम्हांला सभाबंद ? शक्य नाहीं ! कोणीहि आम्हांला या भक्ताच्या सभेंत अटकाव करूं शकत नाहीं. तुम्ही आम्हांला ओळखीत नाहीं काय ? आमच्या सारखे एकनिष्ठ भक्त फारच थोडे सांपडतील. मूर्तीची पूजा करणारांनाच भक्तीचा मक्ता दिला आहे काय ? ”

आपला आवाज चढवून व हातवारे करून हे लोक म्हणाले, " अन्याय ! अन्याय !! असें करावयाचें होतें तर अगोदरच तसें प्रसिद्ध कां केलें नाहीं ? भक्ताची कसोटी कशाला परिषदेवर लावलीत ? आतां त्या कसोटींत उतरणारांना तुम्ही मंडपांत घेतलेंच पाहिजे. हे द्वाररक्षका, तूं असें पहा तुळस काय, गांजा काय दोन्ही वनस्पतींच ना ? तुळसीची माळ नुसती गळ्यांत घालणारांना मुक्तद्वार ! व गांजाची माळ नुसती गळ्यांत न घालता त्याचा अर्क गळीं उतरविणारांना मज्जाव! खासा न्याय ! परिषद भरविणारांना तारतम्य ज्ञान थोडेंच दिसतें. "भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास" आम्हां इतकें देहा–बद्दल उदास प्राणी सांपडणें भूतलावर दुर्मीळच ! खरे गांजा-गुरु हे आपल्या शिष्यवर्गाला भक्तीचे धडे वर्षेगणिक देत बसत नाहींत. " आपणा सारिखे करिती तात्काळ । नाहीं काळ-वेळ तया लागीं ॥ " आमच्या गुरुजीनें आम्हांला एकदांच धडा दिला. ह्या धड्याचें व्याख्यान कोणाला ऐकूं जाण्या–सारखें नव्हतें. " गुरोस्तुमौनंव्याख्यानम् " अशातला तो प्रकार होता. गुरुमाऊलीची कृपा होतांच देहाची ममता सुटली.

सुंदर कपड्यावरची आसक्ति गेली, सुग्रास अन्नाची आवड नाहींशीं झाली. आम्ही गांजोपासनेत तल्लीन झालो कीं जिलबी व भाकरी आम्हाला सारखीच वाटतें. दोन दोन दिवस उपवास पडले तरी त्याची क्षिति नसते.

घरांत नानाविध उपभोगाचे पदार्थ असले तरी त्याकडे आम्ही ढुंकूनही पहात नाहीं. खेळ, करमणुकी व नाटकें सर्व सुटली. लोक निंदा कानावर नेहमीं येतें पण ती ऐकून उपासना सोडण्याचा दुबळेपणा आम्हा गांजा भक्तांना आवडत नाहीं म्हणून "गांजा मर्द है" हा वाक्‌प्रचार तुम्हाला ऐकू येतो. आमचा नित्याचा व्यवसाय म्हटला कीं, भक्ताचा मेळा जमवावा व आनंद रस लुटावा. तेव्हां म्हणतो भक्त परिषदेंत येण्याला आम्हाला हक्क नाहीं का ?"

चिटणीस महाशय हें भाषण ऐकून भांबावले व विशेष विचार न करतां गांजा भक्तांना आंत घेऊन गेले. या वेळीं सभेंत स्वागताध्यक्ष उभे राहून बोलू लागले होते. ते म्हणाले.

"सभ्य गृहस्थहो— इतक्यात नंगे साधूंच्या मेळ्यांतून आवाज आला 'आम्ही गृहस्थ नाहीं'— नव्हे, चुकलो, भक्त जनहो आपले मी मोठ्या प्रेमानें स्वागत करतो. आजच्या सभेच्या सुरवातीला कोणाला सभेंत घ्यावें याबद्दल वाद झाला, असा तंटा होऊं नये म्हणून साधुश्रेष्ठ तुकाराम महाराजांची भक्ताची कसोटी, आम्ही मार्गदर्शक म्हणून ठेविली होती तरीसुद्धां त्या कसोटीला उतरलेलें कांहीं लोक ज्यांना आपण भक्त म्हणणार नाहीं असे आजच्या सभेंत आले आहेत. ह्या लोकांना भक्त म्हणावयाचें कीं, नाहीं याचा निकाल आपले अध्यक्ष करूं शकतील इ. इ.

यानंतर अध्यक्षांची यथोचित निवड होऊन त्यांनीं

भाषणास सुरवात केली ते म्हणाले.

"आपण आज मजवर मोठीच जबाबदारी टाकली आहे. माझेकडून हें काम कसें पार पडेल हें सांगवत नाहीं. इतर परिषदांपेक्षां ही परिषद् व तिचें कार्य निराळें आहे. आपलें दुःख कोणा सरकारकडे ठराव करून पाठवावयाचें नाहीं, आपल्याला नोकऱ्या अगर राखीव जागा मागावयाच्या नाहीत. आपले शत्रु निराकार आहेत, अदृश्य रूपानें ते आपल्या मनोराज्यांत राहतात. त्यांच्या अगोचर शक्तीचा प्रयोग करण्याला संघ शक्ति उपयोगीं पडत नाहीं. एखाद्यानें त्या षड्रिपूंचे दमन केलें तरी तेवढ्यानें आपलें दुसरें बांधव निर्भय होत नाहींत, प्रत्येकाला स्वतंत्रपणें त्याचें दमन करावे लागतेंच असो. आज भक्त कोणाला म्हणावे याबद्दल वाद चालू आहे स्वागत मंडळाचें मनांत भक्त परिषद् म्हणजे **भगवद्भक्त परिषद्** असें होतेसें दिसते, पण त्यांनी भगवद्भक्त असें न म्हणतां केवळ भक्त परिषद् असेंच नांव आजच्या सभेस दिलें. त्यांना नको तें लोक आज आपल्या सभेंत आले आहेत असें चिटणीसांचें म्हणणें आहे. माझ्या समजुतीने यांत कांहीं एक बिघडलें नाहीं. भक्ताची व्याख्या निवडण्यांत चूक झालेली नाहीं देहाची ममता व आप्तेष्टांचा मोहपाश तोडण्याची शक्ति प्राप्त झाल्याशिवाय भक्तीच व्हावयाची नाहीं. ही शक्ती अंगी असून भगवंताची उपासना न करणारे लोक येथें आले आहेत याबद्दल उद्वेग वाटण्याचे काय कारण?

या लोकांची भूमिका तयार आहे फक्त त्यांचा दृष्टिकोन बदलला पाहिजे. सांधा पालटून त्यांची गाडी मुख्य रस्त्यावर आणली पाहिजे. पैसा अगर गांजा काढून त्या ठिकाणीं भगवंताची मूर्ति ठेवली कीं काम झाले. देहाची ममता यांना नाहींच. सांधे पालटण्याचे काम फक्त आपल्याला करावयाचे आहे. सांध्यावरून गाडी जातांना थोडा खडखडाट होईल तो सहन केला पाहिजे. आधुनिक भाषेत बोलावयाचे म्हणजे आपले पुष्कळसे आचार आपल्याच धर्माचे आहेत फक्त शुद्धि करून उपास्य दैवत बदला.

" भगवत्भक्तेतरहो, " आपण खरोखर महान् तपस्वी आहात. आपल्या तितीक्षेला जगात तोड नाहीं. आपण आपल्या उपास्य देवते प्रीत्यर्थ भलताच स्वार्थत्याग केला आहे व तो खऱ्या भगवद्भक्ताला शोभेसा आहे. आपल्या तितीक्षेनें आपले मनःसामर्थ्य फारच वाढले आहे. मानापमान सोडणे ही गोष्ट सोपी नाही. आपण आपलें लक्ष उपास्य मोठे करण्याकडे दिले तर जगात हवी ती शक्ति आपणाला प्राप्त होईल. सर्व विद्या ज्यापासून उगम पावतात तो शंकर विष्णुचीच उपासना करतो म्हणून सरस्वती भक्तांनीं विष्णूची उपासना केल्यास त्यांचे कार्य उत्तम रीतीनें सिद्धीस जाईल. विष्णु हा लक्ष्मीचा पती तेव्हां पतीची उपासना करणारावर लक्ष्मी कां कृपा करणार नाहीं? विशिष्ट औषधींच्या उपासकांनीं आपण ही गोष्ट लक्षांत आणा कीं. आपली औषधी निष्ठा भगवंताकडे लाविलीत

तर तुम्हाला कांहीं उणे पडणार नाहीं! सर्व औषधींचा-वनस्पतींचा पति जो चंद्र तो शंकराचासेवक व शंकर—विष्णुचा भक्त तेव्हां विष्णुच्या उपासनेंत तुमची वनस्पती उपासना येतेच म्हणून म्हणतो उपास्य व्यापक करा. नाही तर त्याच्या ऐवजं समुद्रात शिरा. असो. भगवत्भक्तहो चला. आपल्या या मित्रांच आपण शुद्धि करूं व त्यांना आपल्या मेळ्यांत घेऊं.

अध्यक्षांचे भाषण संपल्यावर नामधारी भक्तांचा शुद्ध समारंभ होऊन भक्त परिषदेचे पहिल्या दिवसांचे काम संपले

---

# भगवत् गीतेतला कलियुगी श्लोक

गीताजयंतीचा तो दिवस होता. आमच्या शाळें सालाबादप्रमाणें मास्तर व विद्यार्थी मिळून ' गीता–पाठ करणार होते. प्रत्येकाकडे एकेक अध्याय नेमून दिला होत पहाटे पांच वाजतां स्नान उरकून, भस्माचे पट्टे लाऊन, सुंद लोकरीची शाल व पायांत खडावा अशा थाटानें ' दत्तूनाना सर्वांचे अगोदर विद्यालयांत आले. त्यानंतर पांच सहा मंडळ कोणी पितांबर तर कोणी मुकटा तर कोणी धूतवस्त्र नेसू आपल्या आसनावर येऊन बसले. भगवान् श्रीकृष्णाची मूर

उच्चासनावर मांडली होती. त्यांचे खालीं गीतेची हस्त-लिखित पोथी रेशमी वस्त्रांत गुंडाळून त्यावर गंधफूल वाहिले होते. मूर्तीपुढें दिवाणखान्यांत अठरा पाट लंबवर्तुळाकार ठेवलें होते. पांचाचे ठोके पडतांच गीतापाठ सुरूं झाला तरी एक पाट रिकामा होताच. पाठ सुरू होऊन पाच मिनिटे झाल्यावर श्रीयुत बिलंबे घाईघाईनें आलें. त्याबरोबर पाठ करणाऱ्या मंडळींना हंसे आवरेना. पण प्रमुखांनीं उच्चस्वरांत म्हणण्यास आरंभ केल्यामुळें श्रीयुत बिलंब्यांची थट्टा तेवढ्यांत थांबली.

दोन तासांनीं पाठ समाप्त झाला व आरती होऊन प्रसाद वाटला गेला. नंतर ७॥ ला गीतेची परीक्षा सुरूं झाली. यंदा गीतामंडळाकडून बरीचशी पुस्तकें बक्षिसाकरितां मिळाली होती. त्यामुळें लहानमोठ्या पुष्कळ मुलांनीं परीक्षेस बसून कोणी एक, तर कोणी दोन, तर कोणी सहा अध्याय पाठ म्हणून दाखवून बक्षिसे मिळविली होती. गीतामंडळानें पाठविलेल्या बाक्षिसाशिवाय गावांतल्या एका गीताभक्तानें सर्व गीता बिनचुक पाठ म्हणणाऱ्याकरिता २५ रुपयांचे बक्षीस ठेविले होते. मुलांच्या लहानमोठ्या परीक्षा संपल्यावर सबंध गीता पाठ म्हणण्याची परीक्षा देणारे तीन उमेदवार पुढें आले. तिघांची परीक्षा एकदम व्हावी. म्हणून गावांतील तीन तीर्थांना निमंत्रण केले होते. ही तीर्थे वेत्रासनावर विराजमान झाल्यावर त्यांचेसमोर उमेदवार मंडळी उभी राहिली.

व्याकरण तीर्थांच्या पुढचे उमेदवार १२ व्या अध्यायाची चढण लागतांच थकले. तेव्हां टवाळखोर श्रोत म्हणूं लागले. आम्हांला वाटले होतेच कीं, वामनचे हे काम नव्हे, गीतेचा हा गड वामन कसचा ओलांडतो. इतक्यांत तीर्थांनीं प्रेक्षकांना गडबड थांबविण्याची इषारत दिली. शंकररावचा इकडे जो वाक्प्रहार आतांपर्यंत चालू होता तो १७ व्या अध्यायाच्या अखेर राजापूरच्या गंगेप्रमाणें एकदम आटला. तेव्हा अरेरे ! असे उद्गार कित्येकांच्या तोंडातून निघाले. एकजण म्हणाला ' भगवान श्रीकृष्णाशिवाय आजपर्यंत कोणीच अठरा अध्याय म्हणूं शकला नाहीं. ' तों दुसरा म्हणतो ' आणि त्याला तरी रणागण सोडल्यावर पुन्हां गीता म्हणावयास सांगितली तर पुन्हा येत होती कोठें ? ' ह्या दोघांचे बोलण्यावर मात करण्याकरितां तिसरा म्हणाला ' अहो ! टिळक अठरा अध्याय घडघड म्हणत होते. ' तो त्याला पुष्टी देण्याकरितां चौथा म्हणाला ' म्हणूनच आमच्या नाशिकच्या कवी गोविंदानें म्हटले आहे कीं—

' टिळक नव्हे हे श्रीगीतेचे हृदय प्रगट जाहले '

असा हा वाद चालला आहे तो तर्कतीर्थ कर्कश वाणीनें बोलले ' आम्हाला परीक्षा घेऊं देणार कां तुमचीच चर्पटपंजरी चालविणार ? '

मंडळीं एकदम गप्प झाली. यावेळीं सत्यव्रत सहस्रबुद्धे यांचा पाठ चालला होता. सत्यव्रताची वाणी निर्दोष होती,

स्वर मधुर होता व स्मरणशक्ति चांगली होती, यामुळें त्याचा पाठ जवळ जवळ दीड तास चालू असून कोणाला कंटाळा आला नव्हता. सतरावा अध्याय संपून अठराव्या अध्यायाला व्यवस्थित आरंभ केल्यावर मंडळीस वाटूं लागलें कीं, हा गृहस्थ पल्ला गांठणार. अठराव्याचे १२ श्लोक झाले. कर्माची पांच कारणें सांगून, नव्हे म्हणून झाली. बुद्धीचे भेद सांगतांना सत्यव्रत कुठें अडला नाहीं. सुखाचे प्रकार कथन करतांना चाळिसाव्या श्लोकावर गाडी आली तरी तो चांचरला नाहीं. तेव्हां एक गृहस्थ उद्गारले—

" सत्य अखेरी मारणार बरं कां ? त्याबरोबर तर्क-तीर्थांनीं नाकावर बोट ठेवून श्रोतृवर्गास गप्प राहण्याचा इषारा दिला स्वभावसिद्ध कर्मानें तूं बांधला गेला आहेस असे म्हणतांना ६० वा श्लोक संपला. त्याबरोबर दुसरे एक अधीर गृहस्थ म्हणाले, " हत्ती गेला शेपुट राहिले, ठेवा, आता २५ रुपये टेबलावर " अशी भाषा कानीं पडत आहे तो सत्तरावा श्लोक होऊन ' अर्जुना तुझा मोह गेला काय? ' असे खडसाऊन विचारणारा श्लोक सत्यव्रताचे मुखातून बाहेर पडला. त्यावेळीं श्रोतृवर्गाच्या भावना खूपच उचंबळून आल्या होत्या. एकजण म्हणाला, ' झाले, जिंकले बक्षीस. ' इकडे सत्यव्रत श्लोकापाठीमागून श्लोक शांतपणें म्हणत होता. इतक्यांत तर्कतीर्थ ओरडले ऐका—

" सत्यव्रत ७३ रावा श्लोक टाकून तुम्ही ७४ रावा

म्हटलांत. गडबडीत हा श्लोक म्हणण्याचा राहून गेलेला दिसतो म्हणून चूक सुधारण्याची मी तुम्हांला संधी देतो. ”

सत्यव्रत मनाची समता यत्किंचितहि ढळूं न देतां परीक्षकांस म्हणाला ‘ मी शेवटपर्यंत एकदा म्हणत जातो व मग आपण माझ्या चुका दाखवा. ’

‘ मग काय दाखवा कपाळ ! अरे, एक श्लोक चुकला तर तुझे बक्षीस जाईल याची आहे कां शुद्ध ! मी संधी देतो त्याचा फायदा वेड्या घे कीं ! ’

असल्या चांगल्या उमेदवाराचें बक्षीस जाणार म्हणून तर्कांचे तीर्थ प्रेमानें खवळलें. पण अफाट समुद्रांत प्रवास करणाऱ्या प्रचंड बोटी समुद्राच्या खवळण्याकडे दुर्लक्ष करून आपला मार्ग आक्रमीत जातात त्याप्रमाणें सत्यव्रतानें आपला पाठ चालूं ठेवून शेवटीं ‘ यत्र योगेश्वरः कृष्ण म्हणून ’ १८ वा अध्याय व गीता समाप्त केली.

यानंतर मंडळींत बरीच चर्चा झाली. परीक्षक म्हणाले, “ सत्यव्रत, बक्षीस तुमचे होते पण ते एका श्लोकानें घाल-वलेत. ’ यावर श्रोत्यांनीं कळवळून विनंति केली कीं,

“ तर्क--तीर्थांनीं तर्ककठोर न होतां तीर्थाप्रमाणें थोडे प्रवाही व्हावे. ”

यावर हायकोर्ट जज्जाच्या गंभीर वाणीनें परीक्षक म्हणाले,

“ बक्षिसाच्या नियमाप्रमाणें मला तुम्हाला माफी

देतां येत नाहीं परंतु ज्यूरीच्या मतास— लोकमतास—मान देऊन तो गाळलेला श्लोक म्हणण्याची मी परवानगी देतो. इतकेंच नव्हे तर पाहिजे तर तो श्लोक आठवूनही देतो. आणखी काय सवलती मी देणार ? म्हणा, ‘ नष्टो मोह स्मृतिर्लब्ध्वा ’—

सत्यव्रत नम्रपणानें उठून उभा राहिला व म्हणाला “ महाराज, हा श्लोक मला पाठ येत नाहीं अगर मघाशी तो मला आठवला नाहीं असें नाहीं परंतु माझे वडिलांनीं मला सांगितले आहे कीं,

नष्टो मोहः स्मृतिर्लब्ध्वा, त्वत्प्रसादान्मया ऽ च्युत ॥
स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥

हा श्लोक द्वापारयुगाच्या अर्जुनाचे तोंडी आहे तो ठीक आहे. हा श्लोक दूरदर्शी ऋषींनीं कलिवर्ज्यात टाकला आहे म्हणून कलियुगात हा श्लोक गाळून गीता नेहमी म्हणत जावी म्हणजे प्रतिज्ञाभंगाचे पातक टळते हा श्लोक गाळून गीता— पाठ करायला, त्यावर भरपूर चर्चा करायला बिलकूल हरकत नाहीं मोठमोठाली भाष्यें त्यावर रचलीं तरी कांहींएक बिघडणार नाहीं पण संसारांतील मोह नष्ट करण्याची आपली इच्छा नसतांना व गीतेतल्या कर्मयोगाचे आचरण करण्याचा आपला हेतूं यत्किंचितही नसतांना ‘करिष्यें वचनं तव’ असें म्हणण्यांत काय अर्थ आहे ! यदाकदाचित गीतेंत सांगितल्याप्रमाणें आचरण

करण्याचा संकल्प करशील तर सांगून ठेवितो, तुझा संसार बिघडेल व व्यवहार फसेल.

असा माझ्या पित्यानें धाक घातला आहे. माझे वडील व्यवहारदक्ष गृहस्थ आहेत. त्यांच्या उपदेशावर माझा पूर्ण विश्वास आहे म्हणून पंचवीस रुपयांच्या बक्षिसाच्या लोभानें 'करिष्यें वचनं तव' असें मी कदापि म्हणणार नाहीं. शिवाय मी आपणांस असें नम्रपणें सुचवितो कीं, कलिवर्ज्य प्रकरणाच्या आधारानें माझी यत्किंचितही चूक झालेली नाहीं. तेव्हां बक्षीस मला द्यायला कोणतीच अडचण तुम्हांस भासूं नये.

कलिवर्ज्य प्रकरण आमच्या परीक्षकांनीं पाहिलें नव्हते असें नाहीं. परंतु सत्यव्रताच्या निश्चयी बोलण्यानें त्यांनाही क्षणभर भ्रांती पडली. शेवटीं तिघा परिक्षकांनीं असें ठरविलें कीं कलिवर्ज्य प्रकरण पुन्हां एकदां पाहूं व नंतरच बक्षिसाचा निकाल करूं.

